
नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक ३२३ / ऑक्टोबर ते डिसेंबर २००७

**हार्दिक अभिनंदन**

**प्रा. म.द. हातकणंगलेकर**

नियोजित अध्यक्ष
८१ वे अखिल भारतीय
मराठी साहित्य संमेलन, सांगली

अनुक्रमणिका





स्नेहनिमंत्रण

साहित्यिक कलावंत प्रतिष्ठान, पुणे

७ वे

साहित्यिक कलावंत संमेलन



संमेलनातील कार्यक्रम

- ग्रंथमहोत्सव
- शिल्प व चित्रकला प्रदर्शन
- ग्रंथपूजन
- बालजगत
- चित्ररंजनासह बालकविता
- महाचर्चा
- नवोदितांचे कविसंमेलन
- परिसंवाद -१
- परिसंवाद -२
- अभिनेत्यांशी गप्पा
- कथाकथन
- प्रतिभा संवाद
- मान्यवरांचे कविसंमेलन

दि. २१, २२ व २३ डिसेंबर २००७

* स्थळ *

यशवंतराव चव्हाण नाट्यगृह
कोथरुड, पुणे ३८.

मा. दिलीप बराटे — अध्यक्ष
मा. दिवाकर पोफळे — उपाध्यक्ष
प्रा. शैलेश त्रिभुवन — कार्याध्यक्ष
मा. वि. दा. पिंगळे — सचिव
मा. संजय भामरे — खजिनदार

Website : www.sahityikkalavantpratishthanpune.com Email : dilip_barate@yahoo.co.in

अनुक्रमणिका



महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३२३
ऑक्टोबर ते डिसेंबर २००७

•••






**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०
दूरभाष - २४४७५९६३

अनुक्रमणिका



## अनुक्रमणिका



मुद्रक-प्रकाशक

**डॉ. माधवी वैद्य**

प्रमुख कार्यवाह

**महाराष्ट्र साहित्य परिषद,** टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.

संगणकीय अक्षरजुळणी, मुद्रणस्थळ

**जंगम ऑफसेट प्रा. लि.,** २५/१० नांदेड फाटा,

सिंहगड रस्ता, पुणे - ४११ ०४१

**किंमत १५/- रुपये**

प्रकाशन : डिसेंबर २००७

*या अंकात व्यक्त झालेल्या विचारांशी संपादक*
*आणि संपादन-समिती, सल्लागार मंडळ*
*अथवा प्रकाशक सहमत असेलच, असे नाही.*

संपादकीय

# शताब्दीच्या उंबरठ्यावर 'मनोरंजन' - दिवाळी अंक

महाराष्ट्राच्या प्रबोधनयुगाचा जाणता साक्षीदार म्हणून शंभर वर्षांपूर्वीचे 'मनोरंजन'चे दिवाळी अंक आज एक ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून बहुमोलाचे आहेत. 'मनोरंजन'चे संपादक-काशीनाथ रघुनाथ मित्र यांनी दिवाळी अंकाच्या रूपाने साहित्य-संस्कृतीच्या उत्सवाचा १९०९ पासून प्रारंभ केला; त्यास आज शंभर वर्षे होत आली असून प्रतिवर्षी तो नव्या जोमाने साजरा होत आहे. लोकमान्य टिळकांनी सुरू केलेल्या गणेशोत्सवाप्रमाणेच दिवाळी अंकाचा उत्साह सदाबहार आहे.

**मनोरंजनचा १९०९चा दिवाळी अंक** १९२ पृष्ठांचा असून त्यात श्रीमन्महाराणी सौ. चिमणाबाई गायकवाड, सौ. काशीबाई कानिटकर, शांताबाई हेर्लेकर, लक्ष्मीबाई टिळक, डॉ. भांडारकर, नामदार गोखले, न्यायमूर्ती सर चंदावरकर, प्रिं. परांजपे प्रभृतींचे वैचारिक लेख, महाराष्ट्रातील निवडक कर्तबगार स्त्रीपुरुषांचे परिचय व फोटो इ. वैचारिक साहित्याबरोबर प्रो. भाटे, प्रो. कोसंबी, प्रो. पटवर्धन, चंदशेखर, मोगरे 'माधवानुज' इ. च्या कविता व उद्‌बोधक लेख आहेत. हा अंक घाईत काढावा लागला; परंतु रसिकमान्य झाला. यातील अपुऱ्या इच्छा पुढील अंकात पूर्ण केल्या.

**मनोरंजनचा १९१०चा दिवाळी अंक** मात्र 'गुदस्तापेक्षाही अधिक साहस करून, अत्यंत परिश्रम करून आणि पुष्कळ पैसा खर्च करून... महाराष्ट्राच्या चरणी सादर केला आहे' असे संपादक श्री. का. र. मित्र म्हणतात; त्याची सत्यता अंक वाचल्यावर पटते. ह्या अंकाच्या वैविध्यपूर्ण रूपाने दिवाळी अंकाचा जणू वस्तुपाठच घालून दिला आहे. अंकाच्या प्रारंभीच १८१० ते १९१० या कालखंडातील महाराष्ट्राच्या प्रबोधनयुगाच्या ११३ मानकऱ्यांचा छायाचित्रांसह नेमक्या शब्दात परिचय करून दिला आहे. यात त्रावणकोरचे 'नेटिव्ह असिस्टंट टु दि कमिशनर' आर-रूबगुंडे-व्यंकटराव, जगन्नाथ-नाना शंकरशेठ मुर्कुटे, दादोबा पांडुरंग, परशुरामपंत तात्या गोडबोले, दादोबा पांडुरंग कृष्णशास्त्री राजवाडे, भाऊ दाजी लाड, लोकहितवादी, कृष्णशास्त्री आणि विष्णुशास्त्री चिपळूणकर, सार्वजनिक काका, म. फुले, विष्णु परशुरामशास्त्री पंडित, बाबा पद्‌मनजी, खान बहादूर काजी शहाबुद्दीन, न्या. रानडे, अण्णासाहेब किर्लोस्कर, राजा रविवर्मा, डॉ. आनंदीबाई जोशी, व्हायूओलेट क्लार्क, गो. ग. आगरकर, बॅरिस्टर बद्रुद्दिन तय्यबजी इत्यादी ज्ञात आणि आज विस्मृतीत गेलेल्या कर्तबगार विभुतींचा परिचय म्हणजे साहित्योत्सवाचे नमनच आहे.

दिवाळी अंकात वैचारिक चर्चा घडवून आणणे, सामाजिक, राजकीय अथवा सांस्कृतिक क्षेत्रातील ज्वलंत विषयावर विचारवंतांचे मार्गदर्शन लेखरूपाने मांडून त्या विषयाची अनेकांगांनी माहिती प्रकट करणे, याचाही पाया मनोरंजनच्या दिवाळी अंकानेच घातला. संमतीवयाचा कायदा होण्यास ज्या चर्चा घडून आल्या त्यात मनोरंजनच्या १९१० च्या दिवाळी अंकातील- 'आमच्या वधुवरांच्या लग्नाची वयोमर्यादा' या विषयावरील आयोजित केलेला विचारवंतांचा परिसंवाद उद्‌बोधक आहे. सौ. काशीबाई हेरलेकर, प्रो. धोंडो केशव कर्वे, काशीबाई कानिटकर, भारताचार्य चिं. वि. वैद्य, नामदार गोपाळ कृष्ण गोखले, रमाबाई रानडे, डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर, पार्वतीबाई आठवले, बॅरिस्टर सीताराम नारायण पंडित प्रभृती २७ नामवंतांचे विचार, एक ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून, मनोरंजनकाराने जतन केले आहेत.

विवाहोत्तर दांपत्यजीवनास कायद्याने संरक्षण देणाऱ्या 'दांपत्यदंडनीती'चा विचार हलक्याफुलक्या विनोदी शैलीत मांडणारा लेख आहे. स्त्रियांच्या दागिन्याच्या अतिहौसेवर श्रीपाद कृष्ण कोल्हटरकरांची



अनुक्रमणिका

'पति हाच स्त्रीचा अलंकार' ही गंभीर शैलीतील कथा आहे. इंग्रजी शिक्षणाने पतीपत्नीच्या प्रेमाविष्काराला संकोचाने प्रकटरूप देणारी ग. कृ. आगाशे यांची 'विडा' ही कथा आहे.

'बालबोध मेव्या'च्या संपादिका कुमारी एमलीबाई बिसेल यांचा 'आमची धाकटी प्रजा' हा लेख, 'मुलांसाठी सुटीच्या काळातील वेळ दिशाहीन मोकार जातो.' तो तसा जाऊ नये म्हणून केवळ व्यक्तिविशिष्ट आईबापांचे कर्तव्य नसून समाजाचे आणि समाजासाठी काम करणाऱ्या सरकारचेही आहे. मोकळ्या हवेत व्यायामासाठी, आवडीचे छंद जोपासण्यासाठी, अभ्यासेतर वाचनासाठी वाचनालये आणि क्रीडावने सरकारच्या देखरेखीखाली स्वयंसेवकांकरवी संस्थातमक पातळीवर चालावीत. सुटीचा अभ्यासक्रम, मुलांच्या नैसर्गिक वृत्ती-प्रवृत्तींना विधायक वळण लावणारा करमणुकीच्या अंगाने मनोरंजक असावा. हा विचार आजही अंतर्मुख करायला लावणारा आहे.

१८९७-९८ साली बडोदे शहरात प्लेगने थैमान घातले होते. त्यातून बाहेर येतात न येतात तोच दुष्काळाला तोंड द्यावे लागले. या संकटात दिवाणबहादुर वासुदेव माधव समर्थ यांनी आपत्ती-व्यवस्थापनाचा अनुभव शब्दांकित केला आहे. तो आजही मार्गदर्शक आहे.

चित्रकार श्रीमंत बाळासाहेब पंत प्रतिनिधी (चीफ ऑफ औंध) यांच्या दुर्मिळ चित्रकलेचे दर्शन मनोरंजनच्या १९१०च्या दिवाळी अंकाने घडविले आहे. 'अभिज्ञान शाकुंतल'मधील एका उत्कट प्रसंगाचे- 'शकुंतला-निरोप' या प्रसंगाचे आणि मेवाडच्या महाराण्यांच्या 'मृगये'चे लक्षवेधी चित्र, हे त्या अंकाचे वैशिष्ट्य आहे. मृगयेचे स्वभावोक्तिपूर्ण वर्णन करणारी दीर्घकविता गणेश जनार्दन आगाशे यांची आहे. कुंचल्याचे चित्र आणि शब्दचित्र दोहोंचा ललितरम्य आविष्कार- असा दुर्मिळ योग या अंकात घडवून आणला आहे. याशिवाय रे. ना. वा. टिळक, बालकवी ठोंबरे, माधव जुलियन, लक्ष्मीबाई टिळक इ. च्या कविता आहेत.

कै. गं. भा. उमाबाई यांचे विष्णु मोरेश्वर महाजनी यांनी रेखाटलेले स्वभावचित्र विधवेच्या दैनंदिनीचे आहे. विधवांचे कौटुंबिक जीवनातील स्थान कसे होते; याचे ते हृदयस्पर्शी चित्रण आहे. वंगकवयित्री आणि चित्रकार श्रीमती गिरींद्र मोहिनीदत्त यांचे व्यक्तिचित्र आणि काव्यपरिचय खूप बोलके आहेत.

एकूण २२२ पृष्ठांचा हा एक संग्रहणीय ग्रंथच आहे. महाराष्ट्राच्या आणि पर्यायाने भारताच्या प्रबोधन युगाच्या पाऊलखुणा या अंकातील प्रत्येक पानावर लेखरूपाने दिसतात.

निर्णयसागर छापखान्यात याची छपाई झाली असून मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी, गिरगाव (मुंबई) यांनी तो वितरित केला आहे.

देशातल्या सर्व सामाजिक-सांस्कृतिक चळवळींचे दर्शन यात घडते. शतकापूर्वीचा दिवाळी अंक एवढेच त्याचे श्रेय नाही, तर शतकावर ज्यांचा प्रभाव होता अशा सामाजिक, सांस्कृतिक आणि शैक्षणिक विचार प्रवाहांचा त्रिवेणी संगम म्हणजे मनोरंजनचा दिवाळी अंक होय. दिवाळी अंकाची ही गंगोत्री उगमस्थानीच अनेक मुखांनी विशाल प्रवाह घेऊन वाहू लागली. सरस्वतीचा हा प्रवाह अनेक रूपांनी आजही वाहतो आहे. ज्याच्या दर्शनाने नतमस्तक व्हावे अशा त्या ऋत आणि सत्यरूप ज्ञानप्रवाहाच्या शताब्दीनिमित्त हे 'यथामिलित शब्देन पूजन' वाचकांसमोर ठेवले आहे. ह्या अंकाचे पुनर्मुद्रण शताब्दीनिमित्त व्हावे, ही इच्छा !

सु. कुलकर्णी

संपादक

७, गायकवाड कॉलनी, सावेडी रोड,

अहमदनगर ४१४ ००३. दूरभाष : ०२४१-२४२९७५५

दि. ४-१२-२००७







अनुक्रमणिका

# प्रा. मधुकर दत्तात्रेय हातकणंगलेकर

अध्यक्ष ८१वे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन, सांगली.
व्यक्ती आणि साहित्यिक परिचय.

जन्म : १ फेब्रुवारी १९२७, हातकणंगले (जि. कोल्हापूर)

शिक्षण : एम्.ए. (इंग्रजी), पुणे विद्यापीठ.

कार्य : १९५० ते १९८७ विलिंग्डन महाविद्यालय, सांगली येथे इंग्रजी विषयाचे प्राध्यापक. (१९७३ ते १९७८ या काळात विलिंग्डन महाविद्यालयाचे प्राचार्य.)

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, विश्वकोश निर्मिती मंडळ, कराड साहित्य पुरस्कार समिती, रा. श्री. जोग पुरस्कार समिती, साहित्य अकादमी समिती, ज्ञानपीठ- मराठी समिती, जी.ए. कुलकर्णी स्मारक समिती (स्थापना), श्री. दा. पानवलकर स्मृती-व्याख्यानमाला, कुलगुरू कै. भा. शं. भणगे स्मृती-व्याख्यानमाला इ. समित्यांवर सदस्य म्हणून कार्य केले.

**लेखन कार्य :**

* समीक्षा :

१) साहित्यातील अधोरेखिते, सुपर्ण प्रकाशन, पुणे, १९८०

२) लघुकथा, रूप आणि परिसर, सुपर्ण प्रकाशन, पुणे, (१९८६)

३) साहित्य विवेक (समीक्षा लेखसंग्रह) (सैद्धांतिक, पुस्तक परीक्षणे व साहित्यिकांचा अभ्यास)

**⁂ संपादन :**

१) विचारधारा - १९७९ (प्रभाकर पाध्ये यांच्या निवडक लेखांचे संपादन) कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे.

२) वाङ्मयीन शैली आणि तंत्र - १९८१ (विलिंग्डन महाविद्यालयात आयोजित केलेल्या परिसंवादातील ३२ अभ्यासकांच्या व्याख्यानांचे संपादन. अजब पुस्तकालय, कोल्हापूर.

३) मराठी साहित्य स्वरूप आणि प्रेरणा (सहकार्याने संपादन) पॉप्युलर प्रकाशन प्रा.लि., मुंबई -१९८६.

४) डोह काळिमा - जी.ए. कुलकर्णींच्या निवडक कथांचे संपादन पॉप्युलर प्रकाशन प्रा. लि., मुंबई १९८७.

५) श्री. दा. पानवलकर यांच्या निवडक कथा (संपादन) विश्वमोहिनी प्रकाशन, पुणे - १९८७.

६) श्री. दा. पानवलकर निवडक कथांचे संपादन. साहित्य अकादमी, दिल्ली.

७) ललित शिफारस (संपादन) मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई १९९०.

८) जी एं ची निवडक पत्रे (खंड १ ते ४) मौज प्रकाशन गृह, मुंबई.

९) अंक - एकांक (प्रेमानंद गज्वींच्या एकांकिकांच्या १५ परीक्षकांच्या लेखांचे संपादन) मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई २००२.

१०) गंभीर आणि गमतीदार मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई.

११) 'उगवाई' मासिक - संपादन कार्य

**अनुवाद**

१) प्रेमानंद गज्वी यांच्या 'किरवंत' नाटकाचा इंग्रजी अनुवाद. सी-गल प्रकाशन, कलकत्ता.

२) गो. नी. दांडेकर 'माचीवरला बुधा' आणि व्यंकटेश माडगूळकर 'सती' या पुस्तकांचे इंग्रजी अनुवाद.

३) 'क्वेस्ट' (Quest), न्यू-क्वेस्ट (New Quest) थिएटर युनिट्स बुलेटिन (Theatre Units Bulletin) यातून मराठी कथांचे इंग्रजीत आणि इंग्रजी कथांचे मराठीत अनुवाद.

**ललित :**

'उघडझाप' (आत्मचरित्र) मौज प्रकाशन गृह, मुंबई.
'आठवणीतील माणसे' - स्वरूप प्रकाशन, औरंगाबाद.

**कार्यगौरव :**

१. महाराष्ट्र शासनाचा 'आदर्श प्राध्यापक' पुरस्कार १९७६.

२. महाराष्ट्र फाउंडेशन ग्रंथ पुरस्कार.

३. निवृत्तीनिमित्त तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या हस्ते नागरी सत्कार.

४. 'तौलनिक साहित्याभ्यास' गौरवग्रंथ.

❖❖❖

# श्रद्धांजली

## प्रा. केशव तानाजी मेश्राम
(२४ नोव्हेंबर १९३७ ते २९ नोव्हेंबर २००७)

नाशिक येथील ७८ व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे बिनविरोध निवडून आलेले अध्यक्ष. कवी, कथाकार, कादंबरीकार, ललित लेखक आणि समीक्षक अशा अनेकविध भूमिकेतून मोलाचे साहित्यकार्य करणारे प्रा. केशव मेश्राम वयाच्या ७०व्या वर्षी कालवश झाले. विदर्भातील अकोल्यात सर्वार्थाने प्रतिकूल परिस्थितीत जगणाऱ्या कुटुंबात त्यांचा जन्म झाला. व्यवस्थेचे आघात त्यांच्याही वाट्याला आले; तरीही दलित चळवळीला निरोगी ठेवणारे साहित्य त्यांनी लिहिले.

'हकिकत व जटायू' (१९७२) आणि 'पोखरण' (१९७९) ह्या कादंबऱ्या, विद्रोही कवितांचे संपादन (१९७८), समन्वय (१९७९) 'शब्दांगण' (१९८३) आणि 'बहुमुखी' (१९८४) हे लेखसंग्रह - छायाबन (१९८३) हे हृद्य ललितगद्य तसेच 'अकस्मात' (१९८४) 'उत्खनन' (१९७७), जुगलबंदी (१९८२) इ. काव्यलेखन. खरवड (१९८०), पत्रावळ (१९८१), धगाडा (१९८४), गाळ आणि आभाळ (१९८७), मरणमाळा (१९८८), कोळिष्टके (१९९०), ज्वाला-कल्लोळ (१९९६), खांडव वन (१९९७) इ. कथासंग्रहातून दलितांच्या जीवनाचे वास्तव अनुभव, अन्याय-विषमता इ. चे विदारक सत्य प्रकट झाले आहे. दयानंद महाविद्यालय आणि नंतर मुंबई विद्यापीठात ते मराठी विषयाचे विद्यार्थीप्रिय प्राध्यापक होते. कामगार साहित्यसंमेलन आणि महाबळेश्वरच्या विभागीय साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते.

या थोर मराठी साहित्यसेवकास महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणेची विनम्र श्रद्धांजली !

***

## संशोधक-समीक्षक
## प्रा. मधुकर वासुदेव धोंड
(४ ऑक्टोबर १९१४ ते ५ डिसेंबर २००७)

साहित्याची समीक्षा करताना सामाजिक, राजकीय, सांस्कृतिक आणि चरित्रात्मक असा बहुआयामी आवाका घेऊन संशोधक समीक्षा लिहिणारे प्रा. म. वा. धोंड वयाच्या ९३व्या वर्षी दिवंगत झाले. विद्वत्व आणि रसिकत्व यांचा सुरेखसंगम प्रा. म. वा. धोंड यांच्या रसाळ समीक्षेत दिसून येतो. 'मऱ्हाठी लावणी' (१९५६), ज्ञानेश्वरी-स्वरूप, तत्त्वज्ञान आणि काव्य (१९८०) गडकऱ्यांच्या 'एकच प्याल्याची' समीक्षा करणारे 'चंद्र चवथिचा' (१९८७) ज्ञानेश्वरीतील लौकिक सृष्टी (१९९१), जाळ्यातील चंद्र (१९९४), तरीही येतो वास फुलांना (बा. सी. मर्ढेकरांच्या निवडक कवितांचे रसाळ विवेचन), असंख्य स्फुटलेख असे श्रीमंत साहित्यिक व्यक्तिमत्त्व प्रा. धोंड यांचे होते. त्यांच्या 'ज्ञानेश्वरीतील लौकिक सृष्टी' ला साहित्य अकादमीचा १९९७ चा पुरस्कार आणि प्रियदर्शिनी अकादमी पुरस्कार (१९९२) लाभला. 'जाळ्यातील चंद्र' साठी केशवराव कोठावळे पुरस्कार (१९९५) आणि महाराष्ट्र फाउंडेशन पुरस्कार (१९९७) लाभला, तसेच 'तरीही येतो वास फुलांना' ला म. भि. चिटणीस पुरस्कार मिळाला. प्रा. धोंड हे रसाळ वक्तेही होते. त्यांच्या निधनाने सत्वशील समीक्षकाला मराठी साहित्यसृष्टी मुकली आहे. त्यांना आदरपूर्वक श्रद्धांजली !

***

## 'भ्रमंती'कार कै. प्रमोद नवलकर
यांनाही महाराष्ट्र साहित्य परिषदेची
विनम्र श्रद्धांजली !



अनुक्रमणिका

# सव्वाशे वर्षांचे 'संगीत सौभद्र' : एक स्मरण

डॉ. वि. भा. देशपांडे

बळवंत पांडुरंग तथा अण्णासाहेब किर्लोस्कर यांचे नाव आणि त्यांचे 'संगीत सौभद्र' हे नाटक मराठी नाट्यरसिकजनांचा मानसबिंदू आहे. या नाटकाचा पहिला प्रयोग १८ नोव्हेंबर १८८२ साली पुण्यातील पूर्णानंद नाट्यगृहात झाला. हे नाट्यगृह पुण्यात बुधवार पेठेतील मुख्य चौकानजिक होते. आता त्याचे कोणतेच अवशेष शिल्लक नाहीत. या नाटकाच्या पहिल्या प्रयोगाला यंदा १२५ वर्षे पूर्ण झाली. 'सौभद्र' नाटक रंगमंचावर येण्याआधी किर्लोस्करांनी आणखी काही नाटके लिहिलेली होती. त्यामध्ये 'शांकरदिग्विजय', 'संगीत शाकुंतल', ('संगीत रामराज्य' हे अखेरच्या काळातले अपुरे नाटक) ही महत्त्वाची नाटके.

'संगीत शाकुंतल' १८८० साली रंगमंचावर आले आणि मराठी संगीत नाटक-रंगभूमीचे एक नवे पर्व आरंभित झाले. हा आरंभ एका रात्रीत झालेला नाही. तत्कालीन रंगभूमीची परिस्थिती, किर्लोस्करांचे नाट्यविषयक निरीक्षण, अभ्यास आणि तल्लख प्रतिभा यांचा तो मेळ होता. किर्लोस्कर मूळ कर्नाटकातले. गुर्लहासूर या गावातून महाराष्ट्रात आले. नोकरी-व्यवसाय मिळावा या हेतूने आले. १८७०-८० या दशकात पुणे-मुंबई परिसरात मराठीच्या बरोबरीने उर्दू-पारसी-गुजराती नाटकांचे प्रयोग होत असत. त्याचबरोबर संस्कृत आणि इंग्रजी नाटकांची भाषांतरे लिहिली जात असत. त्यांना 'बुकिश नाटके' या नावाने संबोधले जाई. त्या नाटकांचे प्रत्यक्ष प्रयोग रंगमंचावर होत नसत. किर्लोस्करांच्या आधी विष्णुदास भावे यांनी १८४३ ला संगीत 'सीता स्वयंवर' नाटकाने मराठी संगीत रंगकार्याला प्रारंभ केलेला होताच. एक योगायोग असा की, अण्णासाहेब किर्लोस्करांचा जन्म १८४३ सालीच झाला. किर्लोस्करांना अवघे ४२ वर्षांचे आयुष्य लाभले. १८४३ ते १८८५ हा त्यांचा कालखंड. या काळात फक्त साडेतीन नाटकांच्या लेखनाने त्यांनी आपल्या आयुष्याला आणि नाट्यकर्तृत्वाला नवी झळाळी दिली. मराठी रंगभूमीच्या संदर्भात नवे आयाम निर्माण केले. स्वतःचे नाव चिरंतन केले.

ही सारी पार्श्वभूमी ध्यानात घेऊन 'संगीत सौभद्र'च्या निर्मितीचा विचार करायला हवा. किर्लोस्करांनी आपले पूर्वसुरी विष्णुदास भावे यांच्या नाट्यशैलीचे अनुकरण केले नाही. असे सांगतात की, किर्लोस्कर पुणे मुक्कामी असताना त्यांनी पारसी रंगभूमीवरचे नाजरजींचे 'इंद्रसभा' नाटक पाहिले. ते पाहून असे काहीतरी मराठी जनांच्यासाठी रंजन माध्यम निर्माण करावे, अशी अटकळ मनाशी बांधली. त्यातून 'संगीत शाकुंतल'चा जन्म १८८० साली झाला. या नाटकाचे स्वागत मोठ्या प्रमाणात झाल्यावर मराठी नाट्यरसिकांच्या अभिरूचीचा अंदाज घेऊन १८८२ साली 'सौभद्र' रंगमंचावर आले. वास्तविक किर्लोस्करांची 'शाकुंतल', 'सौभद्र' ही संगीत नाटके रंगमंचावर येण्याआधी सोकर बापूजी त्रिलोकेश्वर यांचे 'संगीत दमयंती' नाटक समोर आलेले होते. त्याचा कोणताच प्रभाव पडला नाही.

एखादे नाटक शतकानुशतके रसिकस्मरणी राहते यामागे अनेक कारणांचा मेळ असतो. दीर्घकालीन नाट्यस्मरणासाठी त्या कलाकृतीत वाङ्मयीन मूल्ये आणि रंगमूल्ये (प्रयोगमूल्ये) असा दोहोंचा एकत्रित योग यावा लागतो. तो सुमेळ 'सौभद्र' मध्ये आहे. हे नाटक इतकी वर्षे मराठी नाट्यरसिक मानसात स्थिरावले ते केवळ संगीतामुळे नव्हे. यातले संगीत हे त्याचे बलस्थान तर आहेच, पण त्याहीपेक्षा काही अधिक गोष्टींचा अंतर्भाव यामध्ये आहे. नाटकातील व्यक्तिरेखांचे मानवी पातळीवरचे परस्परसंबंध किंवा त्या नातेसंबंधांचे लोभसवाणे रूप महत्त्वाचे असते. तसे पाहिले तर अर्जुन आणि सुभद्रा यांच्या प्रेमविवाहाची ही नाट्यकहाणी पाच अंकात नाटककाराने आपल्याला उलगडून दाखवली आहे. तशा अनंत प्रेमकहाण्या आपण नाट्यमांदियाळीत पाहात आलेलो आहोत. शकुंतला,





अनुक्रमणिका

सुभद्रा यांच्या कहाणीतील किमान तपशील आपण जाणत असतोच. मग या सुभद्रेच्या कहाणीचे 'सौभद्र' होताना वेगळे काय होत असते. तर त्या प्रेमकहाणीला एक मानवी अर्थ देऊन, आपल्या प्रतिभास्पर्शाने किर्लोस्कर त्याचे अर्थपूर्ण रूप समोर उभे करतात. त्यातली सुभद्रा ही कोणाची तरी बहीण आहे, प्रेयसी आहे, एक तरूणी आहे अशा विविध स्तरांवर तिच्या मनाचा शोध घेतात. तिचे आपल्या भावांशी (कृष्ण आणि बलराम) यांच्याशी असलेले स्नेहबंध, अर्जुनाविषयी असलेली प्रेमओढ, स्वाभाविक प्रेमवृत्ती ह्या साऱ्यांचा वापर नाटककार करतो. तो वापर करताना इतिहास-पुराण यांचा तपशील न सांगता ती माणसे म्हणून कशी होती, त्यांचे राग, लोभ, हर्ष कसे होते, यांचे दर्शन घडवीत आपल्याला विश्वासात घेतले जाते. आपणही त्या विश्वासाला पात्र ठरून त्या प्रेमकथेत अगदी अलगदपणे गुंतून जातो. नाट्यशास्त्राच्या एका तत्त्वानुसार आपण नाटक पाहताना त्यामध्ये अनेकदा स्वतःला कळत-नकळत पाहात असतो. ते कधी आणि कसे घडते याचा सुगावा आपल्याला लागत नाही. नाटक पाहताना आपले वय, वृत्ती, स्वभाव, परिस्थिती यानुसार आपण कधी सुभद्रा होतो, तर कधी अर्जुन, श्रीकृष्ण, बलराम होत स्वतःला पाहात राहतो. तसे पाहता पाहता ती प्रेमकहाणी आपली किंवा आपल्या भवतालच्या कोणाची तरी होत राहते. मराठी नाटकाचा प्रेक्षक प्राधान्याने तेव्हापासून आजवर मध्यमवर्गीयच आहे. त्याची मानसिकता, सहसंवेदना, अभिरूची यांचा नेमका अंदाज किर्लोस्करांना होता. त्याचा त्यांनी पुरेपूर उपयोग करून घेतला. म्हणूनच 'संगीत सौभद्र' हे नाटक पौराणिक कथानक घेऊनही सामाजिक नाटकच आहे, असे म्हटले गेले ते खरेच आहे !

'सौभद्र' नाटकाच्या प्रस्तावनेत किर्लोस्करांनी म्हटले आहे की, इंग्रजी पद्धतीने या नाटकात रसनिर्मिती करावी असा मानस आहे. याचा एक अर्थ स्पष्ट आहे की, त्यांच्या डोळ्यासमोर संस्कृत नाटकांप्रमाणे इंग्रजी नाटकेही होती. त्यांच्या वाचनात-चिंतनात ती होती. १८५७ यावर्षी मुंबई विद्यापीठाची स्थापना झाली. विद्यापीठाची स्थापना होणे याचा त्याकाळी अर्थ होता, की एक पदवीधर पिढी निर्माण झाली. ती पदवी घेताना अनेकांच्या वाचनात इंग्रजी वाङ्मय आले. त्याला पर्याय नव्हता. आपली संस्कृत भाषा इंग्रजीमधूनच शिकली-शिकवली जायची. ज्या शास्त्री-पंडितांनी त्या पदव्या घेतल्या किंवा त्या आंग्ल ग्रंथांचे वाचन केले, त्यांनी त्यातली काही नाटके मराठीत आणली. त्या भाषांतर-रूपांतर नाट्यकृतींचा उपयोग नव्या नाट्यलेखनासाठी काही मंडळींना झाला. अण्णासाहेब किर्लोस्कर हे त्यांपैकी एक होते. त्या वाचनातून किंवा अवलोकनातून त्यांना वाटत गेले की, आपण इंग्रजी पद्धतीचे नाटक रचावे. वास्तविक रसकल्पना-रससिद्धांत ही भारतीय नाट्यशास्त्रातील संकल्पना आहे. पण अंतिमतः कोणत्याही भाषेतला नाट्यप्रेक्षक असला तरी त्या नाट्यकृतीने आपला प्रेक्षक बांधला जावा हे प्रत्येक नाट्यलेखकाला वाटत असतेच. त्याच्या चित्तवृत्ती उल्हसित व्हाव्यात, प्रमुदित व्हाव्यात हा हेतू असतोच. किर्लोस्करांनी संस्कृत आणि आंग्ल पद्धतींचा विचार करून बहुप्रवेशी अंक रचना केला. स्थल-काल आणि कृती या नाट्यत्रयांचा नेमका विचार केली; आणि तो रंगमंचावर यशस्वी करून दाखवला. या लेखननिर्मितीसाठी (म्हणजे कथानकरचना, व्यक्तिरेखाटन, संवादभाषा, संगीत योजना इत्यादी घटकांसाठी) लागणारी स्वयंभू प्रतिभा त्यांच्याकडे होतीच, पण त्याच्या जोडीला रंगभूमी माध्यमाचे भान त्यांना कमालीचे होते. ते केवळ नाट्यलेखक नव्हते, तर आपण लिहिलेल्या नाटकाचे सादरीकरण कसे करायचे, ते रसिक प्रेक्षकांपर्यंत परिणामकारकपणे कसे पोहोचवायचे याचे आडाखे त्यांना ज्ञात होते. त्यासाठी त्यांनी लेखन तर केलेच, पण उत्तम कलाकारांची निवड केली. स्वतःची नाटक कंपनी काढून नाटकाचे प्रयोग सुरू केले. नाट्यलेखक, संस्थाचालक, मार्गदर्शक, नाट्यनिर्माता अशा चौफेर स्तरांवर वावरत असताना प्रसंगी तोंडाला रंग लावून प्रयोगात उभे राहिले. हे सारे पूर्ण व्यावसायिक दृष्टी ठेवून केले. आपल्याला कोणत्या साधनांच्या आणि माध्यमांच्याद्वारा मराठी नाट्यजनांचे रंजन करायचे आहे, याचा दूरवरचा विचार त्यांनी केला; आणि तो प्रत्यक्षात आणला. यासाठी मला नेहमी वाटते,



अनुक्रमणिका

अण्णासाहेब किर्लोस्कर हे 'पूर्ण रंगकर्मी' होते. आपल्या रंगप्रवासात ते देवाच्या आळंदीच्या प्रवासाला निघाले; आणि त्याच मुक्कामाला पोहोचले. तशी गुणवत्ता त्यांच्या अंगी होती, जिद्द होती. परिश्रम होते. त्या सर्वांचे फलित म्हणजेच 'संगीत शाकुंतल' आणि 'संगीत सौभद्र' ही नाटके आहेत. ती संगीत रंगभूमीची पताकास्थाने आहेत. सव्वाशे वर्षे असे 'पताका स्थान' टिकणे मोलाचे आहे.

या नाटकात संगीताचा भरपूर वापर आहे. साकी, दिंडी पासून अस्सल विस्तारपदांपर्यंतची योजना आहे. तो सारा संगीतगाभा मराठी माणसांच्या मर्मबंधातला ठेवा झाला. एखाद्या सर्जनशील कलाप्रकाराच्या मुळातच त्याच्या विनाशाची बीजे असतात, असे अनेकदा म्हटले जाते. ज्या 'शाकुंतल', 'सौभद्र' नाटकांनी मराठी मनाला सुखावले-लोभावले, त्यातल्या किंवा नंतरच्या काही नाटकांतील संगीताच्या अतिरेकी वापराने प्रेक्षकांना हैराण केले. कारण संगीत नाटकात काय गावे हे सांगितले आहे, पण किती गावे-विस्तार किती करावा हे कोणीच सांगितले नाही. ज्यांनी कोणी, कधी सांगितले त्यांचे सांगणे मनावर घेतले गेले नाही, त्याचा परिणाम व्हायचा तोच झाला. त्या पतनाला, अस्त पर्वाला, अण्णासाहेब किर्लोस्कर जबाबदार नाहीत. त्यानंतरची रंगकर्मींची मांदियाळी आणि आपण नाट्यप्रेक्षकच जबाबदार आहोत. आपण संगीत नाटक हे डोळ्यांनी कमी आणि कानांनी अधिकपणे पाहायला लागलो. नाटक हे दृश्यकाव्य आहे. डोळ्यांसाठी केलेला यज्ञ आहे, असे कवि कालिदासाने म्हटले आहे. ते सारे आपण विसरत गेलो. 'सौभद्र' नाटकाचा, त्यातल्या कथानकाचा, व्यक्तिरेखनांचा, संवादभाषेचा आणि एकूणच रचनेचा आनंद अभिनयाच्या माध्यमातून आस्वादण्याऐवजी नाट्यपदांच्या मैफिली सजवीत राहिलो. सौभद्रची समग्रता गमावून बसलो. कालपरत्वे त्यातले सगळेच चांगले वाटणार नाही. जे अपरिहार्यपणाने गळून पडणारे असेल ते जाऊ द्यावे.





अनुक्रमणिका







काळाच्या आणि अभिरूचीच्या चाळणीतून जे सत्त्व शिल्लक राहते ते महत्त्वाचे असते. 'सौभद्र'च्या संदर्भात तसे 'शिल्लकपण' नक्कीच आहे, म्हणून आजही त्याबद्दल आपण बोलत राहतो.

किर्लोस्कर १८८५ साली निधन पावले. त्यांचे शिष्य गोविंद बल्लाळ देवल यांनी त्यांची सारी नाट्य कारकीर्द पाहिली. त्यांच्या नाटकासाठी पदरचनाही केली. पण त्यांच्यासारखे नाट्यलेखन न करता स्वतःची स्वतंत्र नाट्यलेखन पायवाट निर्माण केली. त्याच काळात उदयाला आलेले आणखी एक नाटककार श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांनी किर्लोस्करांच्या नाट्यकार्याबद्दल म्हटले आहे, ''अण्णासाहेब किर्लोस्करांची कामगिरी 'अविस्मरणीय' आहे. ती चार प्रकारची आहे. एकतर संगीत-नाटक मंडळ्यांसमोर त्यांनी एक आदर्शरूप मंडळी ठेवून त्यांची कालदृष्ट्या योग्यता वाढविली. दुसरे, त्यांनी नाटक मंडळ्यांचा दर्जा वाढवून त्यांच्याबद्दल सहानुभूती निर्माण केली. तिसरे, सॉक्रेटिस याने ज्याप्रमाणे तत्त्वज्ञान स्वर्गातून भूमंडळीत आणले, त्याप्रमाणे त्यांनी गायनकला मैफिलीतून उठवून घरोघर आणली. लोकांच्या सुखात भर घातली. चौथे, दोन स्वतंत्र चांगली नाटके निर्माण करून कल्पक नाटककारांना कित्ते गिरवून दिले व वाङ्मयात चांगली भर घातली. याप्रमाणे कवी, नट व सामान्यजन या सर्वांस त्यांनी थोडेबहुत उपकारबद्ध करून ठेवले आहे.''

गेल्या शंभर-सव्वाशे वर्षांत 'सौभद्र' वर मोठ्या संख्येने लिहिले गेले. एका नाटकावर आणि नाटककारावर- इतक्या प्रमाणात किंवा इतक्या विविध पद्धतीने मराठीत लिहिण्याचे भाग्य मोजक्या नाटककारांच्या संदर्भात घडले. किर्लोस्कर हे त्यांपैकी एक अग्रणी ! डॉ. व. दि. कुलकर्णी यांनी 'संगीत सौभद्र : घटना व स्वरूप' ग्रंथ लिहून त्या लेखनाला अधिक प्रतिष्ठा दिली. एका नाटकावर प्रबंध लिहून, तो संदर्भग्रंथ व्हावा, इतक्या तोलाची महनीय कामगिरी भारतीय स्तरावर (बहुधा) पहिलीच असावी. एखादे नाटक शेकडो वर्षे जनमानसात राहते याचे मुख्य कारण ते रंगमंचावर प्रवाहित असते. १८ नोव्हेंबर १८८२ ला पहिला प्रयोग झाला, त्यामध्ये महत्त्वाचे कलाकार होते, मोरोबा वाघोलीकर, बाळकोबा नाटेकर, भाऊराव कोल्हटकर आणि खुद्द अण्णासाहेब किर्लोस्कर. दिग्दर्शनही लेखकानेच केलेले होते. नाटककंपनीही त्यांच्याच नावाची होती. नंतरच्या काळात बालगंधर्व, छोटा गंधर्व आणि प्रामुख्याने शिलेदार कुटुंबीय (जयराम, जयमालाबाई, कीर्ती, लता आणि पुढची पिढी) यांच्यासारख्या अन्य अनेक कलावंतांनी प्रयोगरूपाने त्याचे सातत्य राखले. प्रेक्षकांची साथही लाभत गेली. अशा अनेक कारणांनी 'सौभद्र'ने २१वे शतक पाहिले. काही वर्षांपूर्वी मी स्वतः या नाटकाची एक संपादित आवृत्ती पुणे आकाशवाणीसाठी तयार केलेली होती. ती फक्त दीडतासांची होती. राष्ट्रीय पातळीवर हे नभोनाट्य प्रसारित झाले. त्याचे फार मोठे श्रेय पुणे आकाशवाणीचे श्री. पुरुषोत्तम जोशी आणि शिलेदार कुटुंबियांना आहे. म्हणजेच 'सौभद्र' जसे सहा-सात तास चालू शकते तसेच दीडतासातही 'श्रवणीय' होऊ शकते !

❖❖❖

**डॉ. वि. भा. देशपांडे**
'अकल्पित' ३९/७, पटवर्धन बाग, एरंडवने, पुणे ४११ ००४.

# 'उघडझाप' : प्रांजळ मनाचा आविष्कार

## (डॉ. म. द. हातकणंगलेकरांच्या आत्मचरित्राचा परिचय)

प्रा. तानाजी राऊ पाटील, कोपरगाव

मराठी साहित्यव्यवहारातील महत्त्वाच्या घडामोडींवर अत्यंत दक्षतेने नजर ठेवून असणारे सुजाण समतोल विचाराचे समीक्षक म्हणून म. द. हातकणंगलेकर यांचा लौकिक आहे. 'साहित्यातील अधोरेखिते', 'मराठी कथा रूप आणि परिसर', 'साहित्यविवेक' हे त्यांचे महत्त्वाचे स्वतंत्र समीक्षाग्रंथ आहेत. त्यांनी 'उगवाई' सारखे नियतकालिक चालवून अनेक नव्या जुन्या कलावंताना आठ-दहा वर्षे नवे वाङ्मयीन व्यासपीठ उपलब्ध करून दिले. सर्जनशील समीक्षक आणि माणूस म्हणून जगत असताना जे सुख, दुःखाचे प्रसंग त्यांच्या वाट्याला आले. ते त्यांनी प्रामाणिकपणे 'उघडझाप' मध्ये मांडले आहेत. आयुष्याच्या कलत्या सांजेत त्यांनी आपल्या जीवनाचा प्रवास मांडला आहे. त्यांनी हे आत्मचरित्र स्फुट लेखांच्या स्वरूपात १९९५ पासून लिहिले आहे. त्यांनी आपल्या जीवनातील नेमक्या घटना, प्रसंग आणि व्यक्ती निवडल्या आहेत. त्यामधून त्यांच्या जीवनाचा चरित्रपट उभा राहतोच, त्याचबरोबर त्यांच्या वाङ्मयीन जाणिवा विकसित होऊन प्रगल्भ परिणत रसिक, अभ्यासक, कलावंत समीक्षक व्यक्तिमत्त्व कसे बनले त्याचा आलेख चित्रित होतो.

हातकणंगलेकरांचा जन्म हातकणंगले या पेट्याच्या गावी शेतकरी कुटुंबात झाला. त्यांचे वडील उत्तम शेतकरी होते. त्यांची शेतमळ्याची शेती होती. तिच्याशी त्यांचा संबंध आला. त्यामुळे, गाव, शेती, ग्रामीण माणूस तेथील संस्कृतीचा जिव्हाळा त्यांच्या ठिकाणी एकवटलेला जाणवतो. घरच्या माणसांची ऊबदार माया त्यांनी अनुभवली. घरच्या भाजी भाकरीची वेगळी चव आजही त्यांना आठवते. त्यांच्या मळ्यात चालणाऱ्या गुऱ्हाळाचे तपशिलवार चित्रण त्यांनी केले आहे. गावातील अनेक घटना, व्यक्ती, प्रसंग, गावाची रचना या सर्व गोष्टी अत्यंत सहज स्वाभाविकपणे त्यांनी मांडल्या आहेत. हातकणंगलेकरांनी व्यक्तिरेखाटनाला विशेष महत्त्व दिले आहे. त्यांच्या कौटुंबिक जिव्हाळ्याच्या व्यक्तींची शब्दचित्रे त्यांनी रेखीवपणे उभी केली आहेत. त्याचबरोबर त्यांचे मित्र, वाङ्मय क्षेत्रातील साहित्यिक, कलावंत मित्रांचीही व्यक्तिचित्रे त्यांनी शब्दबद्ध केली आहेत.

'आठवणींच्या जगात' या लेखात त्यांनी आपल्या आजीची व्यक्तिरेखा अतिशय परिणामकारक रीतीने रेखाटली आहे. त्यांच्या बाल, कोमल मनावर संस्कार करणारे तिचे व्यक्तिमत्त्व त्यांना लोभस वाटते. तिच्या हातचा स्वयंपाक त्यांना विशेष आवडत होता. तिने त्यांना वेताळपंचविशी, सिंहासन बत्तिशी, इसापनीती, पंचतंत्र, अरबी सुरसकथा यामधील कितीतरी गोष्टी सांगितल्या. त्यामुळे साहित्याबद्दलची विलक्षण आवड लहानपणीच त्यांच्या मनात निर्माण झाली. 'आत्ती' ही त्यांच्या वडिलांची बहीण होती. तिचे नाव हिरा होते. नवरा वारल्यापासून ती भावाच्या घरीच राहात होती. दिवसभर मळ्यात म्हशीला घेऊन जाऊन गडीमाणसांच्यावर देखरेख ठेवत होती. लेखकावर तिची अपार माया होती. ती त्याचे कोडकौतुक करीत होती. दुधाच्या साठलेल्या पैशातून लेखकाला खाऊ देत होती. कधीतरी कपडे घेत होती. आपल्या भावाच्या मृत्यूच्यावेळी दुःखावेगाने तिने जो आकांत मांडला तो भयंकर होता. त्या बहिणभावांच्यामध्ये कितीतरी जिव्हाळा होता. तिच्या मृत्यूने लेखकाला कितीतरी वाईट वाटले. तिच्या मृत्यूनंतरही एक वेळ तिचा भास लेखकाला झाला. त्यावेळी तिच्या चेहऱ्यावरून प्रचंड माया ओसंडत होती. हातकणंगलेकरांनी आईचे म्हणजे मथुबाईचे व्यक्तिचित्र तितकेच भावस्पर्शी उभे केले आहे. आईच्या मायेखाली ते वाढले. आईबद्दलचा उत्कट जिव्हाळा त्यांच्या ठिकाणी दिसून येतो. थोरल्या मुलाच्या चुका घडल्या तर ती त्याच्यावर पांघरूण

घालायची. त्याला सांभाळून घेण्यास लेखकाला भाग पाडत होती. तिच्याबद्दलचा जिव्हाळा, आपुलकी, प्रेम त्यांनी मांडले आहे.

'मरणसाखळी' या लेखामध्ये हातकणंगलेकरांनी आपल्या वडिलांचे आणि भावाचे व्यक्तिचित्र रेखाटले आहे. त्यांचे वडील शाहू महाराजांच्या दरबारात वकील होते. तसे त्यांचे शिक्षण बेताचे होते. त्यांची 'हुशारी' पाहून शाहू महाराजांनी त्यांना सनद दिली होती. त्यांनी गोरगरिबांची कामे करून नावलौकिक मिळविला. त्यानंतर ते शेतीकडे वळले. प्रगतीशील शेतकरी म्हणून त्यांनी शेतीत नवनवीन प्रयोग केले. दुसरा मळा त्यांच्याकडे व्याजाने आला. त्या मळ्याचा मालक मल्ल्याला अजून पैसे हवे होते. त्याची मागणी आर्थिक अडचणींमुळे त्यांना पूर्ण करता आली नाही. त्यामुळे मल्ल्याने त्यांचा निर्घृण खून केला. ही घटना हातकणंगलेकरांच्या कुटुंबावर आघात करणारी ठरली. त्यांच्या कुटुंबाला सांगलीला मामाच्या आश्रयाला जावे लागले. हा आघात हातकणंगलेकरांच्या संवेदनशील मनावर खोलवर असा झाला. चांगल्या, प्रेमळ आणि जिवापाड जपणाऱ्या जवळच्या माणसाच्या अपघाती मृत्यूने ते हळवे बनले. या दुःखाचे चरे त्यांच्या मनावर दीर्घकाळ उमटले. लेखकाचा थोरला भाऊ गुंडोपंत हा कर्तृत्वशून्य निघाला. आयुष्यात स्वतंत्रपणे त्याला काहीच करता आले नाही. संधी मिळाल्यावही ती वाया घालविली. तो छंदीफंदी होता. त्याची पत्नी मात्र त्याच्यावर निष्पापपणे जिवापाड प्रेम करीत होती. तिचे जगणे एखाद्या साध्वीसारखे होते. मात्र लेखकाला आयर्विन हायस्कूल कोल्हापूर येथील इंग्रजी शाळेत घालण्यास घरच्यांना भाग पाडले. त्यामुळे लेखकाचा इंग्रजीकडे अधिक कल वाढत गेला. ना. सी. फडक्यांचे लेखनिक शि. आ. स्वामी त्यांचे मित्र होते. त्यांच्याकडून लेखकाला कथा-कादंबऱ्यांची पुस्तके वाचायला मिळाली. मात्र आयुष्यात तो स्थिर होऊ शकला नाही. तसा त्याचा कुटुंबाला उपद्रवच अधिक झाला.

हातकणंगलेकरांचे मोठे मामा गणपतराव आरवाडे यांनी मोठ्या कष्टातून भागीदारीतून धंदा करीत प्रामाणिकपणे विश्वास संपादन करून मिल आपल्या मालकीची करून घेतली. प्रत्येक गोष्टीच्या पाठीमागे त्यांनी व्यवहार पाहिला. दूरच्या फायद्यासाठी गुंतवणूक केली. नातेवाईकांना अडीअडचणीच्या काळात त्यांनी मदत केली. मोठ्या कुटुंबाचा खाटला त्यांनी चालविला. हातकणंगलेकरांच्या वडिलांच्या खुनानंतर त्यांनी त्यांचे कुटुंब सांभाळले. आपल्या लहान भावाला एलएल्.बी.पर्यंत शिकविले. बायकोच्या निराधार बहिणींना घरी आणले. त्यांची लग्ने लावून दिली. त्यांच्या इस्टेटीचा भाग भांडवल म्हणून त्यांनी वापरला. मात्र त्यांच्या योग्य कारणासाठीच त्याचे पैसे वापरले. दुसऱ्याला फसवावे हा त्यांचा हेतू अजिबात नव्हता. आपली लहान मुलगी हातकणंगलेकरांना देऊन त्यांनी त्यांना जावई करून घेतले. त्यांच्या या प्रत्येक व्यवहारापाठीमागे दूरदृष्टी होती. त्यांना शिक्षण घेता आले नाही. मात्र त्यांनी शिक्षण संस्थेला देणगी दिली. हातकणंगलेकरांचे धाकटे मामा रामभाऊ आरवाडे यांची कलंदरवृत्तीने जीवन जगण्याची पद्धती, बुद्धिमत्ता असूनही सातत्य आणि चिकाटीच्या अभावाने व व्यसनीपणामुळे त्यांच्यापुढे अनेक चांगल्या संधी येऊन सुद्धा त्यांच्या जीवनाला निश्चित दिशा लाभली नाही. हातकणंगलेकरांना वाचनासाठी त्यांनी इंग्रजी, मराठी पुस्तके दिली. त्यांच्या वाङ्मयीन जाणिवा विकसित करण्यास मदत झाली,

हातकणंगलेकर यांनी आपली पत्नी, मुले यांच्या संदर्भात मोजकेच परंतु लक्षवेधी लेखन केले आहे. त्यांचा मुलगा प्रदीप हा आय.आय.टी.तून बी.टेक्., एम.टेक्. झाला. पीएच.डी.नंतर तो बेंगलोरला चांगल्या कंपनीत काम करतो. रेखा पटवर्धन या मुलीशी त्याचा प्रेमविवाह झाला आहे. मुलगा, सुनेचा सुखी संसार पाहून हातकणंगलेकर तृप्त होतात. चार्वी या नातवाबद्दल त्यांना विशेष कुतूहल वाटते. त्याची हुशारी पाहून त्यांना समाधान वाटते. त्यांची मोठी मुलगी रेवती ही वालचंद कॉलेजमध्ये मानसशास्त्राची प्राध्यापिका आहे. १९८६ पासून तिने मतिमंद मुलांच्यासाठी शाळा काढली आहे. ती समाजसेवेचे काम करते. विश्रब्धा या त्यांच्या लहान मुलीचे राहुल पवार या इंजिनिअर मुलाशी लग्न झाले आहे. ती डी.वाय. पाटील मेडिकल कॉलेजमध्ये

पॅथॉलॉजी विभागात लेक्चरर आहे. सुधा या आपल्या पत्नीबद्दल हातकणंगलेकरांनी प्रांजळपणे लिहिले आहे. त्यांच्या पत्नीचा स्वभावही शांत, समंजस असा आहे. हातकणंगलेकरांची अव्याहत वाचन, लेखनाची जी ज्ञानसाधना चालू आहे. त्यामध्ये त्यांनी त्यांना चांगली साथ दिली आहे.

हातकणंगल्यामध्ये बंडोपंत मास्तरांच्याकडून हातकणंगलेकरांना बालवयात पुस्तके वाचायला मिळतात. त्यांची वाचनाची भूक ही सुरुवातीपासून वाढत होती. त्यांच्या मनात वाङ्मयाबद्दलचे आकर्षण निर्माण होत होते. कोल्हापूरच्या आयर्विन हायस्कूलचे प्रिन्सिपॉल स्ट्रेलर यांनी दर्जेदार चित्रपट पाहण्याची सवय त्यांना लावली. त्यामुळे इंग्रजी विषयाची गोडी त्यांच्या मनात वाढत गेली. सांगलीच्या प्रताप मॉडेल हायस्कूल मधील हणमंतराव गोखले यांनी त्यांना चांगले इंग्रजी शिकविले. त्यांनी त्यांना इंग्रजी व्याकरणाची पुस्तके वाचावयास दिली. किर्लोस्कर मध्ये लिहिणारे शं. गो. गोखलेंनी त्यांना इंग्रजी शिकविले. या शिक्षकाच्या व्यक्तिमत्त्वाचा प्रभाव त्यांच्यावर पडला. त्यांची वाङ्मयविषयक जाण अधिकच वाढत गेली.

हातकणंगलेकर यांना मॅट्रिकच्या परीक्षेत ऐंशी टक्क्याहून अधिक मार्क्स् पडले तरीही त्यांनी विलिंग्डन महाविद्यालयात कला शाखेत प्रवेश घेतला. त्यांना इंग्रजी शिकविण्यास प्रा. यार्दी होते. मराठीला कवी गिरीश तर संस्कृतला डॉ. मुगळी होते. 'स्वप्नवासवदत्ता' या संस्कृत नाटकाचा रसग्रहण करणारा दीर्घ लेख इंग्रजीमध्ये हातकणंगलेकरांनी लिहिला. डॉ. मुगळींनी त्यांचे कौतुक केले व त्यांना ग्रंथालयाच्या विशेष सवलती दिल्या.

प्राचार्य पंडितांच्यामुळे विलिंग्डन कॉलेजमध्ये डॉ. राधाकृष्णन, सी.व्ही. रामन, लेडी रामन, बॅरिस्टर जयकर, बॅरिस्टर खर्डेकर या विख्यात विद्वानांच्या व्याख्यानाचा लाभ हातकणंगलेकरांना झाला. वि. स. खांडेकर, अनंत काणेकर, प्र. के. अत्रे, कवी यशवंत आदि नामवंत साहित्यिकांचे विचारही त्यांना ऐकायला मिळाले. प्रा. दि. य. देशपांडे तर्कशास्त्र शिकवीत असत. म्हणून त्यांनी इंटरला तो विषय निवडला. तर्कशास्त्रामध्ये त्यांना पहिला वर्ग मिळाला व तर्कशास्त्राची 'सेल्वी शिष्यवृत्ती'ही त्यांना मिळाली. त्यामुळे त्यांना मुंबईला शिक्षणासाठी जाण्याचा अनेक मित्रांनी सल्ला दिला. मात्र त्यांनी तो न मानता सांगली सोडली नाही. प्रा. एच. बी. कुलकर्णीसारखे अफाट वाचन असलेले जागतिक कीर्तीचे प्राध्यापक त्यांना इंग्रजी शिकवायला होते. तसेच प्रा. भा. म. गोरेही त्यांचे शिक्षक होते. या सर्वांचा त्यांच्यावर प्रभाव पडला. त्यामुळे रशियन कादंबऱ्या, मॅक्झिम गॉर्की, शोलो कॉव्ह, चेकाव्ह, चॉसर, शेक्सपिअर, टॉलस्टॉय, थॅकरे, हार्डी, वर्डस्वर्थ, कोलरीज इत्यादी लेखकांचे लेखन त्यांनी वाचून काढले. त्यांच्या वाचनाला निश्चित अशी दिशा मिळाली. विलिंग्डन महाविद्यालयातील विपुल ग्रंथसंपदा त्यांना वाचायला मिळाली. विद्वान प्राध्यापकांच्या मार्गदर्शनामुळे हातकणंगलेकरांच्या व्यक्तिमत्त्वाला विकसित करण्यास अधिक अवसर मिळाला. अभ्यासूवृत्ती, जिद्द आणि चिकाटी हे गुण तर त्यांच्यापाशी होते. त्यांनी अभ्यासाच्या बाबतीत कधीच कंटाळा केला नाही. स्वतःला घडविण्यासाठी अविरत प्रयत्न केले. ते बी.ए. चांगल्या मार्कांनी पास झालेच; त्याचबरोबर मुंबई विद्यापीठातील प्रतिष्ठित मानले जाणारे इंग्रजीचे 'एलिस' पारितोषिक त्यांना मिळाले. हे पारितोषिक त्यांना मिळाल्यानंतर त्यांनी मुंबईला शिक्षणासाठी जावे असे त्यांच्या मित्रमंडळींना व नातलगांना वाटत होते. मात्र प्रिन्सिपॉल पंडितांनी इथली लायब्ररी चांगली आहे तेव्हा सांगलीतच राहून अभ्यास करण्यास सांगितले. त्यांनी त्यांची फेलो म्हणून नियुक्ती केली. त्याचबरोबर सुपरिंटेंडेंट म्हणून काम देऊन विनामूल्य खोली त्यांना देण्यात आली. एम.ए.च्या वेळेस त्यांच्याबरोबर पु. ल. देशपांडेही विलिंग्डन मध्ये आले होते. बऱ्याचवेळेस शेतीवडीत संध्याकाळी उशीरापर्यंत त्यांची वाङ्मयीन चर्चा घडत होती. त्यामुळे त्यांचा वाङ्मयविषयक आत्मविश्वास अधिक दृढ होत होता.

हातकणंगलेकरांनी प्राध्यापक म्हणून धारवाडला नोकरीची सुरुवात केली; तेथे त्यांनी लेखन वाचनाचा उत्सवच साजरा केला. धारवाडला त्यांचे सहकारी सरकारी काम संथपणे करणारे होते. तेथील संशोधन

केंद्रातून फलित असे फारसे होत नव्हते. देव नावाचे कापूस विभागातील अधिकारी कुंडली मांडत तर प्रा. एस. एम. जोशी सतत विनोद करीत असत. त्याचबरोबर मेन्शनकार्ड नावाचे प्रिन्सिपॉल सतत आरडाओरडा करीत असत. अशी नमुनेदार व्यक्तिचित्रे त्यांनी रेखाटली आहेत. धारवाडच्या वास्तव्यात त्यांची आणि जी.एं.ची मैत्री अधिक दृढ झाली. अनेक वेळा ते एकत्र आले. जी.ए. हे स्वतः करड्या शिस्तीचे होते. त्यांनी आपल्या भोवती संरक्षण कवच निर्माण केले होते. ते त्यांनी जवळून बघितले. जी.एं.चे ते अधिक जवळचे मित्र होते. हे संरक्षण कवच भेदून त्यांनी जी.एं.चे व्यक्तिमत्त्व अनुभवले होते. ते त्यांनी स्वाभाविकपणे मांडले आहे. जी.एं.चे व्यक्तिमत्त्व मृदू, मुलायम, ऋजू, वक्तशीर, स्वाभिमानी असे होते. कलावंत म्हणून इतरांना ते सहजासहजी भेटत नसत. शक्य होईल तेवढी ते भेट टाळत. त्यामुळे एकतर साहित्यनिर्मितीचा वेळ वाया जातो. त्याचबरोबर दुसऱ्याकडून त्यांना काहीही नको असते. त्यांच्या सहानुभूतीचीही गरज त्यांना वाटत नाही. मैत्रीचे संबंध निर्माण झाले की माणसाच्या वागण्यात शिथिलता येते. त्याचा अनेकजण गैरफायदा घेतात असे त्यांना वाटते. ते त्यांना नको होते. जी.एं.च्या लैकिक जीवनाचा संदर्भ त्यांच्या कथेत कसा व्यक्त झाला आहे याचा त्यांनी शोध घेतला आहे. त्यांच्या कथांची निर्मिती आणि जी.एं.च्या कलावंत मनात निर्मितीच्या वेळी चाललेल्या अस्वस्थ खळबळीचा शोध घेण्याचा प्रयत्न हातकणंगलेकरांनी केला आहे.

'जगाचे बंध कोणाला ?' या लेखामध्ये त्यांनी व्यवहाराच्या दृष्टीने विसंगत परंतु आपल्या प्रकृतीला जसे वाटेल त्या पद्धतीने जीवन जगणाऱ्या मित्राचे व्यक्तिचित्र रेखाटले आहे. ते दोन तीन वर्षापेक्षा अधिक काळ कुठेच नोकरी करीत नाहीत. दुसऱ्यासाठी अथवा कोणत्याही कारणाने अधिकाऱ्याशी भांडून राजीनामा देऊन जात. साध्या कारणावरून प्रतिष्ठित शिक्षण संस्थेच्या आजीव सभासदाच्या पदाचा तडकाफडकी राजीनामा देऊन टाकला. झुऑलॉजीचे प्राध्यापक असून त्यांचा गुरूवर प्रचंड विश्वास होता. मनःशांतीसाठी ते मुक्त जगले. मरण सुद्धा त्यांनी तितक्याच सहजतेने स्वीकारले. जीवनात अत्यंत शुद्ध चारित्र्याने वावरले. त्यांच्या पारदर्शी जगण्याबद्दल हातकणंगलेकरांनी विशुद्ध भावनेने लिहिले आहे.

हातकणंगलेकर आपल्या मित्रांच्या सोबत इंग्लंडच्या प्रवासासाठी गेले होते. तेथे त्यांना वसंत चिंचवडकर व माळी या दोन भारतीय चित्रकारांच्याकडे जाण्याचा योग आला. त्यांच्या संदर्भात ते आवर्जून लिहितात. त्यामध्ये चिंचवडकर हे उमद्या, भावुक, सरळ, स्वागतशील मनाचे होते. त्यांनी त्यांची खाण्याजेवणाची व राहण्याची व्यवस्था आस्थेवाईकपणे आपल्या राहत्या घरात केली. ते थोड्याच दिवसात मूळगावी इंदूरला येणार होते. त्यांना आपल्या मातृभूमीची ओढ लागली होती. दुसरे भारतीय चित्रकार माळी हे अतिशय व्यवहारवादी होते. ते कुणाशीही अधिक संपर्क ठेवू पहात नव्हते. ते स्वतःच्या खाजगी जीवनात डोकावण्याची संधीच कोणाला मिळू देत नव्हते. हातकणंगलेकरांनी दोन प्रवृत्तींच्या माणसांची व्यक्तिचित्रे अतिशय मार्मिक शब्दांत रेखाटली आहेत.

'मखमालीची लव आणि कंटकशल्ये' मध्ये हातकणंगलेकर यांनी आपला सर्जनशील कलावंत आणि समीक्षक म्हणून झालेल्या विकासाचा प्रवास मांडला आहे. सुरूवातीला त्यांनी समीक्षा लेखनाबरोबर इंग्रजीमधील अनुवादात्मक कथालेखन 'महाद्वार', 'वसंत', 'सत्यकथा', 'हंस', 'छंद' या मासिकांतून केले. हे लेखन करीत असताना त्यांना स्वतंत्र निर्मितीच्या जवळपास जाणारा आनंद मिळाला. त्यांच्या 'हंस' मासिकामधील 'सॅली गोज राऊंड द मून' या अनुवादित कथेला प्रथम पारितोषिक मिळाले. त्यामुळे त्यांचा उत्साह वाढला. त्याचबरोबर महादेवशास्त्री जोशी, ना. ग. गोरे यांच्या एकेका कथेचा इंग्रजीत अनुवाद केला. मराठी लेखक, प्रकाशकाकडून अनुवादासंबंधीचे वाईट अनुभव त्यांना आले. कॉलेजमध्ये शिकत असल्यापासून हातकणंगलेकरांनी समीक्षा लेखनाला सुरुवात केली. मनोहर, नवभारत, समाज प्रबोधन पत्रिका, सत्यकथा मधून त्यांनी पुस्तक परीक्षणे व समीक्षालेख लिहिले. 'साहित्यातील अधोरेखिते' या त्यांच्या पहिल्याच पुस्तकामध्ये त्यांचे

मौलिक स्वरूपाचे समीक्षालेखन प्रसिद्ध झाले आहे. मर्ढेकरांच्या सौंदर्यशास्त्रावर, श्री. के. क्षीरसागरांच्या टीकाविवेकावर, प्रभाकर पाध्ये यांच्या सौंदर्यानुभवावर व पाटणकरांच्या सौंदर्यमीमांसेवर त्यांनी जे लेखन केले. त्याची मराठी रसिक, अभ्यासक, विचारवंतांना दखल घेणे भाग पडले आहे. श्री. दा. पानवलकर, जी. ए. कुलकर्णी, व्यंकटेश माडगूळकर, सखा कलाल, चारूता सागर यांच्यावरचे लेख रसिकमान्य झाले आहेत. सौंदर्यशास्त्र, कथा, कादंबरी, समीक्षा या लांब पल्ल्याच्या क्षेत्राचा त्यांच्या समीक्षेने अचूक वेध घेतला आहे. त्यांच्यातला सहृदय संवेदनशील मनाचा सर्जनशील कलावंत त्यांच्या समीक्षा लेखनात दडला आहे. त्यामुळे त्यांची समीक्षा कलाकृतीतील सौंदर्यस्थलांचा उलगडा करून दाखविते. त्याचबरोबर त्यांची समीक्षा तर्ककठोर न होता ती अधिक तरल पारदर्शी स्वरूपात व्यक्त होते.

'अर्धशतकातील स्मरणे' मध्ये हातकणंगलेकर पन्नास वर्षापूर्वीचा काळ कसा होता. त्याच्यातील चढउतार, चांगल्या वाईट घटनांचा, प्रसंगांचा समालोचक पद्धतीने आढावा घेतात. स्वातंत्र्यप्राप्तीच्या ध्येयाने प्रेरित झालेल्या कार्यकर्त्यांचे मोहळ सांगलीत वसंतदादांच्या भोवती होते. भगतसिंग, राजगुरू यांचे फोटो अनेकांच्या घरी होते. त्यावेळी परदेशी वस्तूवर बहिष्कार म्हणून परदेशी कपड्यांची होळी हातकणंगले गावातही केली. त्यामध्ये लेखकाच्या वडिलांनी सहभाग घेतला होता. त्यानंतर रत्नाप्पा कुंभार, माधवराव बागल यांनी प्रजापरिषदेची चळवळ सुरू केली. ती त्यावेळी लक्षवेधी ठरली. १९४२ ची चळवळ देशाच्या सर्व भागात पोहचली होती. देशाला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर थोड्याच दिवसात गांधी हत्या घडली. त्यामुळे ब्राह्मणविरोधी विध्वंसक चळवळ निर्माण झाली. त्याचे लोण देशभरात सर्वत्र पसरले. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर शिक्षणामधील पूर्वीसारखे चांगले वातावरण राहिले नाही. शिक्षणाचे सार्वत्रिकीकरण झाल्यामुळे प्रत्येक तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली. त्याचबरोबर नव्याने प्रादेशिक विद्यापीठे निघाली. त्यामुळे शिक्षणाचा दर्जा कमी झाला. प्राध्यापकांना पूर्वीसारखा मान मिळत नाही. तेही ठराविक पद्धतीने काम करतात. महाविद्यालयातून निषेध, मोर्चे, दंगेधोपे, व्यसनाधीनता, चैनीबाज, 'कॉमन ऑफ' या प्रवृत्ती वाढल्या आहेत, यावर चिंतनात्मक पद्धतीने हातकणंगलेकर प्रकाश टाकतात. शासनाच्या कमिट्या, साहित्य संस्कृती मंडळ, साहित्य अकादमी, महाराष्ट्रातील विविध साहित्यिक पारितोषिक संस्था यांचा व्यवहार नीट चालत नाही. गुणवत्तेपेक्षा तडजोड, व्यवहार जास्त पाहिला जातो. याचा अनुभव त्यांना अशा प्रकारच्या समित्यांवर काम करताना आला आहे. निवड समितीवर असताना त्यांनी जी.ए. कुलकर्णींच्या नावाची ज्ञानपीठ पुरस्कारासाठी सतत तीन-चार वर्षे शिफारस केली. मात्र दिल्लीतील कमिटीतील बऱ्याच लोकांना जी.ए. कुलकर्णीच माहीत नव्हते. हा कटू अनुभव त्यांना आला. त्यांच्या मोठ्या मुलीने काढलेल्या मतिमंद मुलींच्या शाळेच्या अनुदानासंदर्भात शासकीय अधिकाऱ्यांकडून त्यांना कटू अनुभव आला. शासकीय कारभार किती बेफिकिरीने चाललेला असतो त्याचे चित्र मांडतात. आपली जगातील सर्वात मोठी लोकशाही आहे. तिला पन्नास वर्षे होऊन गेली तरी सगळा खेळखंडोबा आणि भ्रष्टाचार सुरू आहे. अंतर्मुख होऊन हातकणंगलेकर साऱ्या घटनांवर प्रकाश टाकतात. आज नीतिमूल्ये हरवलेला समाज दिशाहीनतेने भरकटत आहे याचे चित्र मांडतात.

'सारांशाने' मध्ये आपल्या जीवनातील सर्व घटना प्रामाणिकपणे मांडतात. सिगारेटचे व्यसन कसे लागले. कार्यक्रमाच्या निमित्ताने कधीतरी मित्रांनी दारू कशी घ्यायला लावली. कालांतराने प्रकृतीच्या कारणाने त्यांनी या दोन्ही सवयी पूर्णपणे सोडून दिल्या. ते त्यांनी प्रांजळ मनाने मांडले आहे. कुठेही आडपडदा ठेवलेला नाही. मनाची आतून आणि बाहेरून अशी कवाडे त्यांनी खुली केली आहेत. 'स्व'च्या कोणत्याही खोट्या प्रतिष्ठेची आवश्यकता त्यांना वाटत नाही.

निवृत्तीनंतरचा हातकणंगलेकरांचा सत्कार सोहळा फार मोठा झाला. त्यानंतर त्यांच्या साहित्यिक वर्तुळातील मित्रपरिवारातर्फे 'तौलनिक साहित्य अभ्यास' हा गौरव ग्रंथ प्रकाशित करण्यात आला. तर

७५ व्या वर्षाच्या कार्यक्रमाला ग. प्र. प्रधान आले होते. या कार्यक्रमांना त्यांच्यावर प्रेम करणारा साहित्यिक परिवार वेगवेगळ्या भागांतून सांगलीस आला होता. यामधून हातकणंगलेकरांनी आयुष्यभर साहित्य सेवा करीत असताना नव्या जुन्या साहित्यिक माणसांचा गोतावळा किती मोठ्या प्रमाणात निर्माण केलेला आहे हे दिसून येते.

'उघडझाप' मध्ये हातकणंगलेकर गेल्या ७५ वर्षाच्या काळातील घटनाक्रमावर नजर ठेवून लेखन करतात. एवढ्या प्रदीर्घ कालखंडातील घटनाक्रमाला मूर्त रूप देत देत आपल्या जीवनचरित्राचा प्रवास मांडतात. हातकणंगलेसारख्या छोट्या गावातील कितीतरी हृद्य घटना, प्रसंग, व्यक्ती त्यांच्या मनावर कायमच्या कोरलेल्या आहेत. त्यांच्या जीवनप्रवासाबरोबर कलावंत समीक्षकाचा प्रवास विकसित होत जातो. महाविद्यालयीन जीवनात त्याला अधिक अवसर मिळतो. प्राध्यापक झाल्यानंतर लेखन, वाचन आणि चिंतन अव्याहतपणे करीत त्यांनी समीक्षक म्हणून आपले स्वतःचे स्थान मराठी साहित्यात निर्माण केले. त्यांच्या समीक्षेत सर्जनशील कलावंताचे व्यक्तिमत्त्व प्रतिबिंबित झाल्याने ती अभ्यासक, रसिकांना अधिक भावते. विलिंग्डन महाविद्यालयात प्राध्यापकीनंतर ते यशस्वी प्राचार्य म्हणून काम करतात. त्यांना महाराष्ट्र शासनाचा उत्तम प्राध्यापकाचा पुरस्कार मिळाला. मात्र अनेकवेळा कुलगुरूपदाच्या यादीत त्यांचे नाव असूनही त्यांना कुलगुरू होता आले नाही. त्यामध्ये राजकारण चालते याची त्यांना खंत वाटते. स्वतः निधर्मी आणि उदारमतवादी या भूमिकेने ते जगले. मात्र भारतासारख्या देशात जातीधर्माचे, राजकारणाचे वर्चस्व असणाऱ्या समाजात गुणवत्ता असूनही त्यांना अत्युच्च पदावर जाताना न्याय मिळाला नाही. ही बाब अत्यंत चिंतनीय स्वरूपाची आहे. आयुष्यभर व्रतस्थपणे कार्य करणाऱ्या प्रज्ञावान, गुणवान माणसाची केली जाणारी उपेक्षा ही दुर्लक्षिण्यासारखी नाही.

महाविद्यालयात विद्यार्थी असताना हातकणंगलेकर मार्क्सवादाकडे झुकले. त्यानंतर रॉयवादाकडे त्यांचा कल गेला. प्रा. ए. बी. शहा, प्रा. मे. पुं. रेगे, लक्ष्मणशास्त्री जोशी, गोवर्धन पारीख यांच्या सहवासात त्यांना खरे शिक्षण मिळाले असे वाटते. विशेषतः लक्ष्मणशास्त्री जोशींचा सहवास, विचाराची भूमी सर्व मितींनी आखून देणारा, विचाराच्या चोहोबाजूंनी फिरवून आणणारा, विचाराची पूर्व परंपरा उकलून दाखविणारा, नवविचारांना चालना देणारा असा होता. द. ग. गोडसे, वसंत सरवटे, ग्रेस, महेश एलकुंचवार, द. भि. कुलकर्णी, प्रा. ग. प्र. प्रधान, दाभोळकर कुटुंबीय, जी. ए. कुलकर्णी, श्री. दा. पानवलकर, अशोक जैन, विजय तेंडुलकर, व्यंकटेश माडगूळकर, रामदास भटकळ, प्राचार्य राम शेवाळकर इत्यादी मंडळींशी त्यांचा घनिष्ठ संबंध होता. त्याबद्दल त्यांना अतिशय आनंद वाटतो. साहित्यिक कलावंतांच्या सहवासात त्यांच्याशी चर्चा करण्यात, त्यांची सुख, दुःखे समजून घेण्यातच त्यांना आनंद वाटतो. नव्या पिढीतल्या अनेक साहित्यिक कलावंतांशी त्यांचे जवळचे संबंध आहेत. त्यांना ते आधारस्तंभ बनून मार्गदर्शन करतात. 'उघडझाप' मधील मर्मज्ञ, प्रज्ञावंत समीक्षकाच्या जीवनाचा उंचावणारा आलेख लक्षणीय आहे.

**प्रा. तानाजी राऊ पाटील**
साईनगर फादरवाडीजवळ, कोपरगाव, जि. अहमदनगर ४२३६०१

❖❖❖





अनुक्रमणिका





## ।। मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास ।।

### राज्य मराठी विकास संस्थेची प्रकाशने

एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महानगरपालिका मार्ग, धोबीतलाव, मुंबई ४०० ००१.
दूरध्वनी : २२६५ ३९ ६६ / फॅक्स- २२६३ १३ २५

- मराठी लेखन मार्गदर्शिका-यास्मिन शेख. पृ. १८२, मूल्य ८०रु.
- प्रशासनिक मराठी भाषेचा विकास - गीता भागवत - पृ. ४२२, मूल्य १५० रु.
- कोश व सूची वाङ्मय : स्वरूप आणि साध्य - संपा . सरोजिनी वैद्य, सुषमा पौडवाल, अनिता जोशी, कविता महाजन - पृ.३७८, मूल्य २०० रु.
- मराठी लघुलेखन शब्दकोश - व.वा. इनामदार पृ. ३२२, मूल्य १४० रु.
- शालेय मराठी शब्दकोश - वसंत आबाजी डहाके, गिरीश पतके. पृ. ३६०, मूल्य १०० रु.
- शिक्षण , शिक्षक व अभ्यासक्रम - वासुदेव बळवंत पटवर्धन - संपा. रमेश पानसे. पृ. १८६, मूल्य १६० रु.
- मराठी भाषा : वाढ आणि बिघाड - श्री. के.क्षीरसागर - पृ. १९६, मूल्य १७५ रु.
- 'वृद्धि:' भाषेचे आणि भाषाभ्यासाचे विकसन - दिनेश द. माहुलकर - पृ. १४०, मूल्य १६० रु.
- बेलभाषा - सुमन बेलवलकर - पृ.११०, मूल्य १००रु.
- भाषा आपली सर्वांचीच - अविनाश बिनीवाले. पृ. १५०, मूल्य १५० रु.
- महाराष्ट्र साहित्य परिषद - म. श्री. दीक्षित. पृ. ११४, मूल्य ५०रु.
- व्याकरणकार मोरो केशव दामले : व्यक्ती आणि कार्य - कृ.श्री.अर्जुनवाडकर. पृ. १८०, मूल्य १५० रु.
- काकासाहेब कालेलकर : व्यक्ती आणि कार्य - मृणालिनी जोगळेकर - पृ. १८०, मूल्य १५०रु.
- गंगाधर बाळकृष्ण सरदार : व्यक्ती आणि कार्य - हेमंत वि. इनामदार. पृ. १०८, मूल्य ६० रु.
- बालगंधर्व : व्यक्ती आणि कार्य - मोहिनी वर्दे - पृ. ११४, मूल्य ६० रु.
- मातृसेवा संघ - विनया खडपेकर - पृ.१०४, मूल्य ६०रु.
- सकाळ वृत्तपत्र आणि वृत्तसमूह - स्वाती सुहास कर्वे - पृ. १३८, मूल्य ६० रु.
- शंतनुराव किर्लोस्कर : व्यक्ती आणि कार्य - भा. र.साबडे - पृ. १४९, मूल्य १६०रु.
- डॉ.अ.का.प्रियोळकर : व्यक्ती आणि कार्य - डॉ.वि.बा. प्रभुदेसाई. पृ. १२१, मूल्य १४० रु.
- त्र्यंबक शंकर शेजवलकर सूची - सुषमा पौडवाल - पृ. ३१२, मूल्य १५० रु.
- त्रिवेंद्रमची मराठी हस्तलिखिते - संपा. डॉ. वसंत जोशी - पृ. ४१, मूल्य ३० रु.
- मद्रासची मराठी हस्तलिखिते - संपा. डॉ. वसंत जोशी - पृ.२०८, मूल्य १५० रु.
- हैदराबादची मराठी हस्तलिखिते - संपा. डॉ. श्री. रं. कुलकर्णी, डॉ. व.दा.कुलकर्णी, प्रा. द.पं.जोशी - पृ. १६७, मूल्य १००रु.
- कर्नाटकातील मराठी हस्तलिखिते - संपा. डॉ भीमाशंकर देशपांडे. पृ. १८८, मूल्य १५० रु.
- तंजावर सूची - संपा. भीमराव कुलकर्णी - पृ. १९६, मूल्य २०० रु.
- दक्षिण भारतातील मराठी वाङ्मयाचा इतिहास - तंजावर खंड संपा. डॉ. वसंत जोशी - पृ. ७११, मूल्य ५००रु.
- दाक्षिणात्य साहित्य - संस्कृतीचा मराठीशी अनुबंध - डॉ. माणिक धनपलवार - पृ. ३६२, मूल्य ३०० रु.
- साहित्यसेतू - श्री.रं.कुलकर्णी - पृ. २३४, मूल्य ४५ रु.
- दखनी भाषा - मऱ्हाटी संस्कृतीचा एक आविष्कार -श्री.रं.कुलकर्णी - पृ. २२६, मूल्य ४५रु.
- आंध्र - कर्नाटक खंड - संपा. डॉ. वसंत जोशी, डॉ. द. दि. पुंडे - पृ. ६२४, मूल्य ५००रु.
- मराठी विज्ञानग्रंथसूची (१९५१-१९९९) - संपा. रा.वि. सोवनी, संजीवनी शिंत्रे - पृ. ३२४, मूल्य १५० रु.
- मराठी वैद्यकग्रंथसूची (वर्णनात्मक) (१९५१-१९९९) - संपा. डॉ. सुरेश नाडकर्णी, कविता महाजन - पृ. २८०, मूल्य १२५ रु.
- मराठी ग्रंथसूची - भाग १ व २. संपा. कै. शंकर गणेश दाते - पृ.२२६६, मूल्य २६०० रु.
- मराठी ग्रंथसूची भाग - ३ (१९५१-१९६२)- संपा. शरद साठे - पृ. १००३, मूल्य १००० रु.
- मराठी ग्रंथसूची भाग - ४ (१९६३ -१९७०) संपा. शरद केशव साठे - पृ. १०५७, मूल्य ११०० रु.
- वाचू आनंदे - माधुरी पुरंदरे. भाग १ ते ४, संचाचे - ३०० रु.
- यंत्रालयाचा ज्ञानकोश - संपा. शंकर गोपाळ भिडे - १६०० रु.
- विज्ञान संकल्पना कोश - संपा. प्रा. रा. वि. सोवनी - २२५ रु.
- मराठी कोश व संदर्भसाधने यांची समग्र सूची - (१८००-२००३) संपा. डॉ. व. वि. कुलकर्णी - मूल्य २०० रु.

संस्थेच्या इतर दर्जेदार प्रकाशनांसाठी प्रकाशनसूची मागवा.
संस्थेचे संकेतस्थळ - http://rmvs.maharashtra.gov.in







# एका ध्येयधुंद कार्यकर्त्याचं चित्तवेधक आत्मकथन 'ध्यासपर्व'

**ग. प्र. प्रधान**

आयुष्यभर कोणत्यातरी ध्येयाचा ध्यास घेऊन त्यासाठी स्वतःला झोकून देणाऱ्या रावसाहेब शिंदे यांचे हे आत्मकथन अत्यंत चित्तवेधक आहे. या आत्मकथनातून गेल्या साठ-पासष्ठ वर्षांमध्ये महाराष्ट्रामध्ये झालेली राजकीय आंदोलने, सामाजिक चळवळी आणि शैक्षणिक प्रगती याचे वर्णन करताना ग्रामीण भागातील जीवनात जे परिवर्तन झालेले आहे, याचे वास्तव चित्रण रावसाहेबांनी केलेले आहे. लहानपणापासून भोवताली जे घडत असे त्याबद्दल रावसाहेबांना ओढ वाटे. आपण काही तरी केले पाहिजे अशी ऊर्मी त्यांच्या मनात उठत असे आणि मग ते बेभानपणे कामालाच लागत.

नाशिक जिल्ह्यात म्हाळुंगी नदीच्या खोऱ्यातील पाडळी हे त्यांचे सव्वाशे उंबऱ्याचे गाव. डोंगराच्या कुशीत वसलेल्या या गावात रावसाहेबांचे वडील आणि चुलते शेती करीत. बालपणाच्या आठवणी सांगताना रावसाहेबांनी ग्रामीण भागात एकत्र कुटुंब म्हणून राहणाऱ्या शेतकरी समाजातील स्त्री-पुरुषांचे जीवन, गावात होणारे उत्सव, समाजातील चालीरीती यांचे तपशिलवार वर्णन केले आहे. लहानपणी धरतीमाईच्या कुशीत वाढताना खेड्यातल्या कष्ट करणाऱ्या साध्यासुध्या माणसांशी या संस्कारक्षम वयातील मुलाचे जे जिव्हाळ्याचे नाते जुळले ते पुढे आयुष्यभर कायम राहिले.

शिक्षणासाठी जवळच्याच देवठाण या गावी गेल्यावर चांगल्या शिक्षकामुळे या मुलाला अभ्यासात गोडी वाटू लागली आणि बुद्धिमान असल्यामुळे त्याचा स्कॉलरशिपच्या परीक्षेत नगर जिल्ह्यात दुसरा क्रमांक आला. नंतर इंग्रजी शिक्षणासाठी तो प्रथम सिन्नरला आणि १९४० मध्ये नाशिकच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्ये गेला. तेथे तो राष्ट्रसेवा दलात जाऊ लागला आणि त्यामुळे देशभक्तीच्या जगाशी त्याची जवळीक झाली. टिळक पुण्यतिथीस या विद्यार्थ्याने लो. टिळकांचे शब्दचित्र लिहिले आणि त्याचे जे कौतुक झाले, त्याने त्याचा आत्मविश्वास वाढला. १९४२ च्या 'चले जाव' आंदोलनात या विद्यार्थ्याचे थोरले बंधु आण्णाभाऊ हे धडाडीने काम करीत होते. त्यामुळे अन्य समवयस्क मुलांबरोबर रावसाहेबही या चळवळीत शक्य ते करीत असे. त्यांनी आत्मकथनात लिहिले आहे, विचार आणि निष्ठा यांच्या जडणघडणीची बैठक मनात तयार होण्यास १९४२ ची चळवळ ही माझी गुरू ठरली... या संगतीने माझे जीवन संपन्न केले. नाशिकच्या वास्तव्यात त्या वयात माझ्या विचारांना आकार मिळाला.

जून १९४३ मध्ये रावसाहेबांनी संगमनेरला पेटिट हायस्कूलमध्ये इंग्रजी ५वीत प्रवेश केला. काही दिवसांनी संगमनेरला शिकण्यासाठी खेड्यातून आलेल्या २०-३० विद्यार्थ्यांना जमवून रावसाहेब शिंदे, भाऊसाहेब थोरात आदींनी बोर्डिंग सुरू केले. या लहानवयातही रावसाहेब बोर्डिंगसाठी खूप कष्ट करीत होते आणि त्यामुळे बोर्डिंगमधील त्यांचे विद्यार्थीमित्र त्यांना त्यांचे मार्गदर्शक मानायचे. बोर्डिंगमध्ये जातीधर्म पाळत नसत. थोरले बंधू आण्णाभाऊ यांच्यामुळे रावसाहेबांना कम्युनिस्ट विचाराबद्दल आकर्षण वाटू लागले. कॉ. अमर शेख, आण्णाभाऊ साठे, गव्हाणकर हे किसान सभेच्या प्रचाराला नगर जिल्ह्यात आले की ते या बोर्डिंगमध्ये उतरत. यामुळे हे बोर्डिंग हळूहळू कम्युनिस्ट विचारांचे केंद्र बनले. रावसाहेबांनी लिहिले आहे, "मार्क्सवादाचे आकर्षण आम्हाला सहजसुलभ वाटे. आम्ही सर्व ग्रामीण भागातील. अठराविश्वे दारिद्र्याचे दर्शन तर आम्हा सर्वांच्या पाचवीला पुजलेले. सगळेच कष्टकरी कुटुंबातले." १९४५ सालात भाऊसाहेब थोरात आणि रावसाहेब शिंदे हे कम्युनिस्ट पक्षाच्या प्रचार मोहिमेत आघाडीवर असत. राजकारणाच्या या आकर्षणामुळे अभ्यासातील लक्ष कमी झाले तरी रावसाहेब मॅट्रिक पास झाले. कॉलेज शिक्षणासाठी एक वर्ष कोल्हापूरला राहिल्यावर

रावसाहेब शिकण्यासाठी अहमदनगरला आले. त्यांच्या नेतृत्वाखाली कम्युनिस्ट पक्षाच्या विद्यार्थ्यांनी 'स्टुंडटस् फेडरेशन' मार्फत चळवळ उग्र केली. १९४८ साली कम्युनिस्ट पक्षावर बंदी आली आणि रावसाहेब भूमिगत झाले, या काळात क्रांतीची मशाल हाती घेऊन रावसाहेब शिंदे, भाऊसाहेब थोरात यांनी जे काम केले, त्याचे सविस्तर वर्णन या आत्मकथेत आहे. या दोघांनी आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी साहसी कृतीचे काम करताना अनेकदा त्यांच्या जीवावर बेतले; पण ते निर्भयपणे काम करीतच राहिले. रावसाहेबांनी लिहिले आहे 'क्रांतीचा आगडोंब उसळणार आहे; फक्त आपण पुढे होऊन ठिणगी लावून सुरवात केली पाहिजे,' अशा तऱ्हेच्या स्वप्नरंजनात कार्यकर्त्यांना गुंगवण्यात येत होते. रावसाहेबांचे थोरले बंधू आण्णाभाऊ यांना कम्युनिस्ट चळवळीत काम केल्याबद्दल येरवडा तुरूंगात ठेवले होते. तेथून त्यांनी कम्युनिस्ट पक्षाला पत्र लिहून त्या पक्षाचा राजीनामा दिला. त्यांनी, चळवळ आततयी मार्गाने जात आहे, कार्यकर्त्यांचे अकारण बळी पडणार आहेत आणि आपण जनतेपासून अलग पडणार आहोत ही कारणे स्पष्टपणे देऊन, पक्षाचा राजीनामा दिला. परंतु पक्षाने त्याची दखल घेतली नाही. रावसाहेबांच्या नावाने आण्णासाहेबांच्या निषेधाचे पत्रक कम्युनिस्ट पक्षाने वर्तमानपत्रात दिले. रावसाहेब १९५० च्या अखेरीपर्यंत भूमिगत राहिले. १९५१ च्या जानेवारीत त्यांना अटक झाली. मात्र त्यांचा कम्युनिस्ट पक्षाच्या अतिरेकी धोरणाबद्दल भ्रमनिरास झाला. त्यांनी त्यांचे विचार मांडणारे पत्र कम्युनिस्ट पक्षाला लिहिले आणि ते त्या पक्षातून कायमचे दूर झाले.

रावसाहेबांनी लिहिले आहे, ''राष्ट्रीय स्वातंत्र्य चळवळीच्या महत्त्वाच्या टप्प्यावर कम्युनिस्ट पक्षाने चुकीच्या धोरणाचा अवलंब केला होता आणि त्यानंतर दरवेळेला आम्ही चुकलो अशी कबुली देण्याचे नामुष्कीचे प्रसंग पक्षावर आले होते. १९५० सालीही तेच झाले आणि पक्षाला त्याचे भयानक परिणाम भोगावे लागले. सगळ्यांत उद्वेगजनक बाब म्हणजे चुकीच्या धोरणामुळे अनेक कार्यकर्त्यांच्या जीवनाची राख झाली. माझ्यासारखे शेकडो कार्यकर्ते एकदम निराश झाले... कम्युनिस्ट पक्षापासून मी अलिप्त झालो. माझ्या जीवनातले एक पर्व संपले.''

रावसाहेबांनी पुण्याला येऊन पुन्हा शिक्षण सुरू केले आणि बी.ए. व एलूएल.बी. च्या परीक्षा देऊन श्रीरामपूरला वकिली सुरू केली. या काळात उत्तम वकील म्हणून मानमान्यता पावलेल्या थोरल्या बंधुंचे- आण्णासाहेबांचे- मार्गदर्शन आणि सहाय्य त्यांना लाभले.

'कथा प्रवरा कारखान्याची,' हे प्रकरण फार उद्‌बोधक आहे. डॉ. धनंजयराव गाडगीळ यांनी द्रष्टेपणाने यात पुढाकार घेतला. त्यांना विठ्ठलराव विखे पाटील, चंद्रभान पाटील, लामखडे मास्तर, टेकावडे बाबा इत्यादींनी साथ दिली. रावसाहेबांनी लिहिले आहे, स्थानिक व पाटील म्हणून विखे पाटलांना प्राधान्य मिळाले. त्यांनी ती कामगिरी प्रभावीरीतीने पार पाडली. ''स्थानिक शेतकऱ्याकडून शेअर्स जमविण्याबाबत त्यांनी मोलाची कामगिरी केली, पण देशातील पहिल्या सहकारी साखर कारखान्याच्या जन्माचा इतिहास वास्तवावर आधारलेला असला पाहिजे.'' गरीब शेतकऱ्याने केलेले काम झाकोळले जाऊ नये, हे मत रावसाहेबांनी येथे सडेतोडपणे मांडले आहे.

'परीसस्पर्श कर्मवीरांचा,' हे रावसाहेब शिंदे यांच्या आत्मकथेतील सर्वोत्कृष्ट प्रकरण आहे. कर्मवीर भाऊराव (आण्णा) पाटील हे श्रीरामपूरला आण्णाभाऊ शिंदे यांच्याकडे आले असताना रावसाहेबांचा त्यांच्याशी परिचय झाला. १९५१-५२ साली आण्णांनी कर्जत येथे प्रथम 'महात्मा गांधी विद्यालय' सुरू केले. आणि तेथे अहमदनगर जिल्ह्यातील त्यांच्या कामाचा श्रीगणेशा झाला.

आण्णांच्या सहवासात रावसाहेबांना नवी दृष्टी लाभली. ग्रामीण भागात शिक्षणाचा प्रसार झाला तरच समाजपरिवर्तन होऊ शकेल, हे लक्षात आल्यावर रावसाहेब शिंदे हे काम उत्साहाने करू लागले. मुलांनी कष्ट करून शिकले पाहिजे, संस्थेत शिकलेल्या विद्यार्थ्यांनी रयत शिक्षण संस्थेत शिक्षण घेऊन हे काम पुढे चालविले पाहिजे, या कर्मवीर आण्णांच्या शिकवणुकीचा रावसाहेबांच्या मनावर फार परिणाम

झाला. रावसाहेब शिंदे यांनी पुढे जे आयुष्यभर शैक्षणिक कार्य केले त्यांचा उगम कर्मवीर आण्णांच्या सहवासात त्यांच्यावर झालेल्या सुसंस्कारात आहे. 'रयत शिक्षण संस्था' या प्रकरणात रावसाहेब शिंदे यांनी केलेल्या कार्याची केवळ माहिती नाही; हे काम करताना त्यांची तात्त्विक भूमिका काय होती, हे समजून येते. रावसाहेब कृतिशील होतेच, त्याचबरोबर त्यांच्या कृतीस विचारांचे भक्कम अधिष्ठान होते. त्यांनी लिहिले आहे, 'चारित्र्यहीन शिक्षण हे सामाजिक पाप आहे' अशी गांधीजींची विचारधारा होती. कर्मवीर भाऊराव पाटील यांनी विद्यार्थ्यांना गुणवत्तेचे मनोरे जिंकण्याची तसेच शिक्षणात श्रमसंस्कार जोपासणाची प्रेरणा दिली आणि शिक्षकांना सामाजिक बांधिलकीचे धडे दिले. रयत शिक्षण संस्थेत काम करताना रावसाहेब शिंदे यांनी संस्थेच्या कार्यपद्धतीत जी अपूर्णता आहे, तिचाही स्पष्ट उल्लेख केला आहे. कर्मवीर आण्णांच्या विश्वासाला पात्र ठरावे म्हणून रावसाहेब शिंदे यांनी निष्ठापूर्वक, तन, मन, धनाने कार्य केले. ते लिहितात, "ही सगळी माझ्या स्वतःच्या मनाची, स्वेच्छेची धाव होती."

वकिली व्यवसायात रावसाहेबांचे थोरले बंधू आण्णाभाऊ यांनी असामान्य यश मिळविताना सामाजिक बांधिलकी कधी सोडली नाही. रावसाहेब वकील झाल्यावर सुरूवातीस आण्णाभाऊंच्या ऑफिसात बसत आणि पुढे लवकरच ते स्वतंत्रपणे वकिली करू लागले. अल्पावधीत त्यांची बुद्धिमत्ता, त्यांची अभ्यासू वृत्ती आणि कायद्यावरील आणि इंग्रजीवरील प्रभुत्व यामुळे त्यांना अमाप यश लाभले. परंतु रावसाहेबांचे वैशिष्ट्य त्यांच्या मनातील गरिबांबद्दलचे प्रेम आणि त्यांची सत्यप्रियता व न्यायप्रियता यांत होते. अनेक नामवंत वकिलांच्या - यात बॅ. छागलाही येतात, आत्मचरित्रांमध्ये त्यांनी स्वतःच्याच कर्तृत्वाचे वर्णन केले आहे. परंतु रावसाहेबांनी मात्र माझे पक्षकार - माझे गणगोत हे जे प्रकरण लिहिले, ते अगदी वेगळे आहे. ग्रामीण भागात वकिली व्यवसाय करणारे, चळवळीतील पूर्वीच्या सहभागामुळे समाजजीवनाचे पूर्णपणे आकलन असणारे, गरीबांबद्दल उत्कट प्रेम असणारे रावसाहेब शिंदे हे पक्षकारांना आपले कुटुंबीय मानीत. या प्रकरणात त्यांनी लिहिलेल्या कुशाभाऊ कडू, किशन नाईक, चंदूबाई देवकर, माधवराव ताके पाटील, डॉ. सौ. मेरी अब्राहम आर्दीच्या हकिगती वाचताना गरीबांना नागवणारे कज्जे चालू नयेत यासाठी प्रयत्न करणाऱ्या रावसाहेब शिंदे या वकिलाच्या व्यक्तिमत्त्वाचा एक आगळा पैलू प्रकट होतो. रावसाहेब शिंदे यांनी लिहिले आहे... "शाश्वत मूल्ये, पैशाच्या मोबदल्यात मिळत नाहीत, हा बोध गांधीजी आणि लिंकन यांच्यापासून वकील मित्रांनी शिकला पाहिजे. गरीबांचा कोणी वाली नसतो आणि कोर्ट दरबारात त्यांना न्याय मिळणे फारच दुरापास्त होते, हे मी माझ्या वकिली व्यवसायात अनुभवले आहे." रावसाहेबांच्या मनात केवळ गरीब पक्षकारांच्याबद्दल कणव नव्हती. त्यांचा दृष्टिकोन प्रखर समतावादी आहे. म्हणूनच त्यांनी आत्मकथेत लिहिले आहे, "डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी याबाबत मूलभूत विचार व्यक्त केला आहे, तो असा की, कायद्याने हक्काचे संरक्षण होत नाही. त्यासाठी नैतिक आणि सामाजिक सद्सद्विवेकाची आवश्यकता आहे. त्याच अनुषंगाने हा प्रश्न फी कमी जास्त होण्याचा नसून वकिली व्यवसायातील नीतीमूल्यांचा आहे."

रावसाहेब शिंदे हे सहकार चळवळीचे महत्त्व जाणतात. महाराष्ट्रातील सहकारी साखर कारखान्यांमुळे





अनुक्रमणिका



पश्चिम महाराष्ट्र आणि मराठवाडा यांच्यातील काही जिल्ह्यांचे रूप आमूलाग्र बदलले आहे. रावसाहेबांनी स्वतः सहकारी चळवळीत धडाडीने काम केले. हे करताना सहकारातील अनिष्ट प्रवृत्तींशी त्यांनी कसा संघर्ष करावा लागला, हे एका प्रकरणात त्यांनी सांगितले आहे.

रावसाहेब शिंदे यांनी राजकीय, शिक्षण, सहकार, या क्षेत्रामध्ये आणि अनेक संस्थांमध्ये कामे केली. परंतु त्यांनी कधी हाव धरली नाही. रावसाहेबांनी काँग्रेसतर्फे निवडणुकीस उभे राहावे अशी वसंतरावदादांची तीव्र इच्छा होती. परंतु रावसाहेबांनी ती मान्य केली नाही. यशवंतराव चव्हाण यांच्या पुरोगामी धोरणास त्यांचा पाठिंबा होता, त्यामुळे १९६० साली कम्युनिस्ट पक्ष सोडल्यानंतर ते काँग्रेसचे सहप्रवासी राहिले. रावसाहेब शिंदे यांच्या कायद्यावरील प्रभुत्वामुळे त्यांना हायकोर्ट जज्ज होण्याचा आग्रह करण्यात आला, परंतु त्यांनी त्याला स्पष्ट नकार दिला. रावसाहेब हे वृत्तीने रसिक आहेत आणि गुणी माणसांवर त्यांचे प्रेम आहे. त्यामुळे पु. ल. देशपांडे, कुसुमाग्रज आदींच्यासारखे साहित्यिक त्यांचे मित्र झाले. राजकारण, साहित्य, शिक्षण, कृषिज्ञान आदी सर्व क्षेत्रामध्ये रावसाहेबांचे मित्र आहेत. त्यांचा पाहुणचार करणे, त्यांच्या सहवासात गप्पा मारणे, त्यांच्याबरोबर भटकणे यामध्ये रावसाहेबांना फार आनंद वाटतो. माणसावर मनमुराद प्रेम करणारा गोष्टीवेल्हाळ मित्र असे त्यांचे वर्णन राजाभाऊ मंगळवेढेकर यांनी केले आहे, ते यथार्थ आहे. रावसाहेब ध्येयवेड्या माणसावर लुब्ध होतात, बाबा आमटे यांच्याबद्दल त्यांनी या आत्मकथेत उत्कटपणे लिहिले आहे. बाबा आणि साधनाताईंशी त्यांचे ऋणानुबंध कसे दृढ झाले, हे ज्या आपुलकीने लिहिले आहे, ते वाचताना रावसाहेबांच्या ध्येयासक्त मनाची ओळख पटते.

रावसाहेब आणि त्यांचे थोरले बंधू आण्णासाहेब यांच्या जीवनाचे धागे एकमेकांमध्ये गुरफटले होते. आण्णासाहेब स्वातंत्र्य चळवळीत काम करीत होते, त्यामुळे रावसाहेब हे लहानवयात चळवळीकडे ओढले गेले. पुढे आण्णासाहेबांच्यामुळेच रावसाहेब मार्क्सवादी विचाराने प्रभावीत झाले. कम्युनिस्ट चळवळीत त्यांनी स्वतःला झोकून दिले. कम्युनिस्ट पक्षाच्या आततायी धोरणाचे घातक परिणाम आण्णासाहेबांच्या लक्षात येताच त्यांनी निर्भयपणे तो पक्ष सोडला. रावसाहेबांनी हे काही वर्षांनी केले. वकिली व्यवसाय करताना सामाजिक बांधिलकी ठेवायची असते हे पथ्य आण्णासाहेबांच्याप्रमाणेच रावसाहेबांनीही आयुष्यभर पाळले. आंण्णासाहेब केंद्रात मंत्री झाले, रावसाहेब मात्र काँग्रेस पक्षाचे सहप्रवासीच राहिले. या साऱ्या प्रवासाचे भावपूर्ण निवेदन या आत्मकथेमध्ये आहे.

रावसाहेबांना त्यांच्या पत्नी शशिकलाताई यांनी आयुष्यभर जी साथ दिली, त्यांनी त्याचे थोडक्यात वर्णन करताना, शशिकलाच्या रूपाने मला, गदिमांच्या भाषेत 'भगवंताचे देणे लाभले, हे माझे भाग्य' असे भावनोत्कटतेने लिहिले आहे. रावसाहेबांनी शशिकलाताईंच्याबद्दल थोडे अधिक लिहावयास हवे होते.

'ध्यासपर्व' ही केवळ एका व्यक्तीची आत्मकथा नाही. तिच्यामध्ये गेल्या पन्नास-साठ वर्षांतील महाराष्ट्राच्या राजकीय, सामाजिक, शैक्षणिक चळवळींचे वास्तव चित्रण केले आहे.

रावसाहेब शिंदे यांनी महाराष्ट्रात, देशात कार्याच्या निमित्ताने आणि आपल्या मातृभूमीचे सम्यक् रूप दिसावे म्हणून भरपूर प्रवास केला. ते परदेशातही अनेक ठिकाणी गेले, पण त्यांचे मन रमते ते श्रीरामपूरमधील महादेव मळ्यात. तेथील शेती-भातीत, गुरा-ढोरांत आणि स्वतःच्या घरकुलातील प्रेमळ कुटुंबात. या आत्मकथेचा शेवटचा परिच्छेद अप्रतिम आहे, अविस्मरणीय आहे. त्यातील शब्दाशब्दांतून रावसाहेब शिंदे यांना धरतीमातेवर प्रेम करण्यात जो आनंद, जे साफल्य लाभले, त्याचा हृदयस्पर्शी आविष्कार झालेला आहे

❖❖❖

'ध्यासपर्व' ले. श्री. रावसाहेब शिंदे
मु. पो. श्रीरामपूर, जि. अहमदनगर.

ग. प्र. प्रधान
महाराष्ट्र आरोग्य मंडळ, माळवाडी, हडपसर, पुणे ४११ ०२८.

# एका बुद्धिवैभवाचे स्मरण

## अ. द. मराठे

मराठी साहित्यसमीक्षा आणि सामाजिक चिंतन या क्षेत्रात नोव्हेंबर १९०१ ते एप्रिल १९८० या काळात एक प्रचंड बुद्धिवैभव होऊन गेले. त्याचा तळपण्याचा काळ १९३७ पासून सुरू झाला आणि अखेरपर्यंत तळपत राहिला. या बुद्धिवैभवाचे नाव आहे श्री. के. क्षीरसागर. सौंदर्यवाद आणि आध्यात्मिक बैठक हा टीकादृष्टीचा पाया असलेले टीकाकार क्षीरसागर ! जागल्याच्या भूमिकेने भाषा, समाज, जात, वर्ग, स्त्रिया यांच्याकडे पहाणारे आणि पहायला शिकवणारे क्षीरसागर. त्यांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने 'श्री. के. क्षीरसागर - व्यक्ती, टीकादृष्टी आणि टीकासृष्टी' हा गौरवग्रंथ प्रसिद्ध झाला आहे.

स्मरणग्रंथ/गौरवग्रंथ यांचे स्वरूपच असे असते की रद्दीत टाकावे तर मनाला अपराधीपणा येतो आणि ठेवावे तर अडगळ होते. हा ग्रंथ मात्र संग्रहात ठेवावा असाच आहे. पुढील पिढीतील ज्या अभ्यासकाच्या हातात हा पडेल त्याला श्रीकेक्षींकडे वळण्याचा अनिवार मोह होईल आणि त्याची निराशा मुळीच होणार नाही.

ग्रंथाची सुरुवात सुमति कुलकर्णी या पुतणीच्या 'वज्रादपि कठोराणि...' या लेखाने होते. लहानपणी संबंध व संपर्क दुरून, पण अभ्यासातील प्रगतीवर लक्ष ठेवणारे आणि संकटात काळजी करत बसणारे काका. पुढे नव्या वाटेने जीवनमार्ग आखताना प्रोत्साहन देणारे काका असे घरगुती चित्र, तर गं. ना. गोगळेकर यांनी काढलेले बौद्धिक जीवनाचे चित्र हे दोन लेखच इतके परिपूर्ण आहेत की त्यातूनच श्रीकेक्षींच्या वैयक्तिक आणि बौद्धिक जीवनाचे चित्र उत्तमपणे उभे राहाते. स्मरणग्रंथात अशी योजना बहुधा प्रथमच असावी. जोगळेकरांनी श्रीकेक्षींची साहित्यविश्वातील वेगळी श्रद्धास्थाने, सावरकर, पटवर्धन, भारत सरकार यांच्या भाषाशुद्धी-चळवळीवर केलेले प्रहार, अश्लीलता-विरोधी चळवळीतील सक्रिय सहभाग, वृत्तपत्रीय सदर लेखन अशा अनेकानेक पैलूंचा परिपूर्ण आढावा घेतला आहे.

'टीकाविवेकः प्रदीर्घ तपस्येचा उदात्त आविष्कार' हा लेख म्हणजे श्रीकेक्षी जन्मशताब्दीनिमित्त ग.प्र. प्रधान यांच्या झालेल्या व्याख्यानाचे शब्दांकन आहे. त्यामुळे त्यात विशेषतः पूर्वाधात-विस्कळितपणा जाणवतो. पण पुढे मात्र त्यात प्राध्यापक प्रधान जाणवतात. या ग्रंथाचा पूर्वार्ध उत्तुंग आहे. उत्तरार्ध मात्र मूलग्राही 'लिटररी क्रिटिसिझम'मध्ये कमी आहे हे मत नोंदवतानाच त्यांनी मतभेदही नोंदवले आहेत. डॉ. स्वाती कर्वे यांचा याच ग्रंथावरचा लेख लगेच येतो. 'टीकाविवेक' मध्ये श्रीकेक्षींनी काव्यात्म-टीका या टीकाप्रकाराचे सामर्थ्य काय असावे याचा ऊहापोह केला आहे. अशा टीकेची उदाहरणे म्हणून श्रीकेक्षींनी स्वतःचीच उदाहरणे न देता गटे, पेटर, रवींद्रनाथ टागोर यांनी केलेल्या काव्यात्म टीकेची उदाहरणे दिली आहेत. मात्र श्रीकेक्षींचा हा टीकाविचार पुढील टीका लेखनात; मांडलेल्या उपपत्तीचा पाठपुरावा, विकास, बळकटी, तात्त्विक मांडणी, या प्रक्रियेतून रुजला नाही याची खंत व्यक्त केली आहे. अत्यंत ओघवत्या शैलीतील या लेखाची रचना अशी आहे की त्यातून ग्रंथाचे सार कळावे आणि कुतूहलाने ग्रंथाकडे वळावे.

'वाद-संवाद' या पुस्तकाचे डॉ. व. दि. कुलकर्णी यांनी केलेले परीक्षण १९६१ मधील आहे. यापूर्वी श्रीकेक्षींची काही पुस्तके प्रकाशित होऊन त्यांना चांगली प्रसिद्धीही मिळाली होती. 'पहिल्या दोन संग्रहांपेक्षा या संग्रहाचे संपादन म्हणजे टीकालेखांची निवड अधिक साक्षेपाने आणि एकसूत्रात्मक अशी झाली आहे.' हे यातील वाक्य वाचताना श्रीकेक्षींना अगदी अल्पशी का होईना, पण उमेदवारी करावी लागली यांची गंमत वाटते. या परीक्षणात श्रीकेक्षींनी नवसाहित्याला काहीच प्रोत्साहन देऊ नये यावर आश्चर्य व्यक्त करून व. दि. म्हणतात, 'क्षीरसागरांनी आपल्या समर्थ टीकेने नवकलेच्या जन्महेतूशी खेळ खेळणाऱ्यांचा आपल्या

समर्थ टीकेने नायनाट करावा.'

श्रीकेक्षींचे आत्मचरित्र हे अभिजात साहित्याच्या प्रेरणेने लिहिलेले आहे. ''आजच्या काळातील वाचकांना यात खूपच मर्यादा दिसून आल्या, औचित्यविचार वाजवीपेक्षा जास्त सांभाळलेला दिसला, सनसनाटी घटनांचा अभाव दिसला, वाचक-लेखकांमध्ये वाजवीपेक्षा जरा जास्तच अंतर राखून निवेदन केल्याचा पडताळा आला तरी प्रस्तुत लेखन 'अभिजात आत्मचरित्रा'च्या मराठी लेखनाचा लक्षणीय नमुना आहे'' अशा शब्दांत डॉ. आनंद यादव यांनी 'तसबीर आणि तकदीर' या आत्मचरित्राचा गौरव करून पुढे अधिक विश्लेषण केले आहे.

'सुवर्णतुला' आणि 'सागरमंथन' ही दोन पुस्तके सोळा व्यक्तींच्या अभ्यासाची आहेत. डॉ. केतकरांनी अशा प्रकारच्या लेखनाला 'व्यक्तीचे महत्त्वमापन' ही संज्ञा दिली आहे. प्रख्यात व्यक्तीसंबंधीचे प्रचलित ग्रह तपासून पहाण्याच्या श्रीकेक्षींच्या प्रवृत्तीतून हे लेखन जसे घडले तसेच ते हिबर्ट जर्नल, नेशन, टाईम्स लिटररी सप्लीमेंट या नियतकालिकांच्या वाचनातून प्रेरणा घेऊन घडले आहे. हा लेख 'पॉप्युलर प्रकाशन'च्या रामदास भटकळांनी लिहिला आहे. त्यांच्या या लेखनात श्रीकेक्षींविषयीचा आदर आणि प्रेम व्यक्त होताना दिसते.

या 'सुवर्णतुले'चे एक अधिकारी कै. श्रीधर व्यंकटेश केतकर यांच्यावरील लेखाचे सत्त्वशीला सामंत यांचे परीक्षण आहे. त्याचा अप्रतिम शेवट येथे उद्धृत करतो. 'पुराणात भगवान् श्रीकृष्णाच्या सुवर्णतुलेची कथा प्रसिद्ध आहे. तिचे यावेळी स्मरण होते. या ठिकाणी मात्र खुद्द सव्यसाची 'श्रीकृष्ण' हे 'श्रीधरा'ची सुवर्णतुला करण्यास सरसावले, पण ते देखील थकले. अखेरीस त्यांनी दुसऱ्या पारड्यात 'शीलवती' नामक तुळशीदल टाकले तेव्हाच ती तुळणा भारंभार झाली.''

'मराठी भाषा : वाढ आणि बिघाड' या पुस्तकाचे डॉ. कल्याण काळे लिखित परीक्षण दिले आहे. कोणतीही भाषा ही आपल्या गतीने स्वाभाविकपणे वाढत असते तिचे 'शुद्धीकरण' हा निरर्थक आयास आहे असे श्रीकेक्षींचे अगदी वास्तव मत आहे. या दृष्टीने त्यांनी सावरकर आणि माधवराव पटवर्धन यांची भाषाशुद्धि चळवळ आणि इंग्रजी शब्दांचे अखिल भारतीय संस्कृतीकरण करण्याच्या रघुवीरी उद्योगांवर टीका केली आहे.

गझल, सूफी, शायरी या साहित्यप्रकाराचे श्रीकेक्षी दर्दी होते. त्यांनी 'सूफी लीव्हज' याइंग्रजी कवितासंग्रहातील ११६ सूफी पर्णांचे भाषांतर केले. ती 'समीक्षक' आणि 'रागिणी' (दिवाळी अंक) यांतून १९४०-४१ आणि १९४५ मधून अनुक्रमे छापून आली. मात्र यांचे पुस्तक होऊ शकले नाही. याची खंत व्यक्त करीत अशोकदादा विलीन जावडेकरांनी प्रातिनिधिक दहा पर्णे उद्धृत करून विवेचन केले आहे.

'राक्षसविवाह' ही श्रीकेंची पहिली वाङ्मयीन कृती. ही एक सामाजिक कादंबरी असून तिची १९३१ मध्ये ७ प्रकरणे 'प्रगती' मधून व उर्वरित 'संजीवनी' मधून आली. फडके-खांडेकरी गुलाबी प्रणयकादंबऱ्यांपेक्षा ही वेगळी होती. स्त्रीपुरुष आकर्षण, प्रीती आणि विवाह या बाबतीत वास्तवाचे भान असलेली, त्यात जाणवलेले कटुसत्य सांगणारी, त्याविरूद्ध झगडण्याचा मार्ग शोधणारी आणि आदर्शाचे स्वप्न सांगणारी अशी ही कादंबरी आहे. तिचे गुणदोषात्मक परीक्षण विनया खडपेकर यांनी केले आहे.

रा. ग. गडकरी यांच्या 'एकच प्याला' नाटकाची मूलगामी जीवनचिंतन करणारी समीक्षा श्रीकेक्षींनी केली. १९४६ साली त्यांनी या नाटकाला ६७ पानांची दीर्घ प्रस्तावना लिहून हे नाटक रोमँटिक ट्रॅजेडी आहे असे प्रतिपादन केले. ही प्रस्तावना इतकी मौलिक ठरली की तिच्या प्रसिद्धीनंतर गडकऱ्यांच्या नाटकांवर टीका करणाऱ्या रा. शं. वाळिंबे, वि. स. खांडेकर यांना आपली मते बदलून नवीन लेखन करावे लागले. गडकऱ्यांची नाटके समीक्षकांना, अभ्यासकांना विचारप्रवृत्त करू लागली. या प्रस्तावनेतून श्रीकेक्षींनी शोकांतिकेसंबंधी सखोल आणि गंभीर चर्चा मराठीत आणली. मानवी मनोरचनेचे वैशिष्ट्य स्पष्ट करून सद्गुणी सज्जनांच्या वाट्याला दुःखे का येतात आणि अशा दुःखांच्या कथा आपण सुखी संसारकथांहून अधिक आवडीने का ऐकतो याची उत्तरे देत त्यांनी शोकांतिकेचे मर्म सांगितले आहे. या प्रस्तावनेवर डॉ. विनायक गंधे यांचा लेख आहे.

'वाङ्मयीन लेखसंग्रह' माझ्या वैयक्तिक संग्रहात आहे. त्यातील विषयांचे वैविध्य आणि लेखांची संख्या मोठी आहे. अशा पुस्तकांचे परीक्षण/परिचय किती अवघड असते याचा परीक्षणलेखक म्हणून मला चांगला अनुभव आहे. मात्र हे आव्हान लेखिका डॉ. मेधा सिधये यांनी अत्यंत समर्थपणे पेलले आहे. माझ्या दृष्टीने हा या पुस्तकातील सर्वोत्कृष्ट लेख आहे.

'केशवसुत आणि तांबे' हे श्रीकेक्षींचे शेवटचे पुस्तक. यावर डॉ. नीलिमा गुंडी यांनी परीक्षण केले आहे. त्याचे तीन भाग आहेत. १) केशवसुतकृत क्रांतीः एक आकलन. २) अन्य रसिकांच्या मतांचे खंडन ३)क्षीरसागरांची समीक्षादृष्टी : वैशिष्ट्ये व मर्यादा. यातील मर्यादा दाखवताना डॉ. गुंडी यांनी दाखवलेला धीटपणा प्रशंसनीय आहे, कारण तो उत्तम व्यासंगातून आलेला आहे. या पुस्तकातील हा आणखी एक अत्युत्कृष्ट लेख आहे.

१९६९ मध्ये श्रीकेक्षींनी पुणे विद्यापीठात रवींद्रनाथ टागोर यांच्या साहित्यावर तीन व्याख्याने दिली. त्या व्याख्यानांचे 'आधुनिक राष्ट्रकवी रवींद्रनाथ ठाकूर' या नावाने पुस्तक प्रसिद्ध झाले. त्यावर डॉ. मृणालिनी गडकरी यांनी परीक्षण केले आहे. त्याच्या पूर्वार्धात त्यांनी तपशिलासंबंधीच्या श्रीकेक्षींच्या अनेक त्रुटी दाखवून दिल्या आहेत. उत्तरार्धात या व्याख्यानांचे गुण दाखवले आहेत. त्रुटींची संभाव्य कारणे दाखवत त्यांचे थोडे समर्थनही केले आहे. डॉ. गडकरी यांच्या लेखनामागे त्यांचा रवींद्रसाहित्याचा व्यासंग स्पष्ट होतो आणि त्यामुळे त्रुटींचे दर्शन योग्यच वाटते: "श्री. के. क्षीरसागरांची जी रोमँटिसिझमची कल्पना होती त्यात रवींद्रनाथांना बसवण्याची ही धडपड आहे... रवींद्रनाथांची रोमँटिक वृत्ती ही भारतीय मातीतून आलेली होती. ती उर्दू कवींकडून घेतलेली नव्हती आणि इंग्रजांच्या रोमँटिसिझमशी तिचा सुतराम् संबंध नव्हता' हे वाचल्यावर वाटले श्रीकेक्षींची अवस्था कालिदास म्हणतो तशी 'स्वतां कामी स्वतां पश्यति' अशी तर झाली नव्हती ? व्याख्यानांचे शब्दशः रूपांतर पुस्तकात झाले आहे का अशीही शंका मला येते. तसे असेल तर व्याख्यानाच्या ओघात आलेल्या काही अनावश्यक गोष्टी पुस्तकात गाळणे इष्ट होते असे पृ. १६१ च्या प्रारंभी आलेल्या विवेचनावरून वाटते. पुस्तक आणि व्याख्यान यांचे स्वरूप ध्यानात न घेता हे पुस्तक प्रसिद्ध झाले असेल तर त्याविषयी खूप काही बिघडले आहे असे म्हणावेसे वाटते.

'व्यक्ती आणि वाङ्मय-लालित्यपूर्ण आस्वादक समीक्षा'- डॉ. मीरा धांडगे आणि 'उमर खय्यामची फिर्याद' मधील विचार वैभव- मेधा भागवत यांनी या पुस्तकांचा परिचय थोडक्यात यशस्वीपणे करून दिला आहे. दोन्ही लेखांचा समारोप त्यांची श्रीकेक्षींबद्दलची आदराची भावना प्रकट करणारा आहे.

'श्रीकेक्षींचे समाजचिंतन आणि संस्कृतिविचार' आणि 'श्रीकेक्षींचा जातिविषयक विचार' हे दोन लेख डॉ. सुधांशु गोरे यांनी लिहिले आहेत. त्यासाठी त्यांनी अनुक्रमे श्रीकेक्षींचे १९४९-७९ दरम्यानचे ३५ लेख व १९४८-७७ मधील १६ लेख अभ्यासले आहेत. कारण या लेखांची पुस्तके झालेली नाहीत. दोन्ही लेखांमधील काही मार्मिक वाक्ये उद्धृत करतो. पहिल्या लेखात मध्यम वर्गीयांचे चित्र येते. १) सुशिक्षित, लेखणीच्या

व्यवसायावर जगणारा आणि अब्रूला जपणारा तो मध्यमवर्ग. जरी त्यात ब्राह्मणांचा भरणा अधिक असला तरी कायस्थ, मराठे व इतर जातीतील लोकही त्यामध्ये असतातच. २) शिक्षणाशिवाय तरणोपाय नाही, पण शिक्षणाला किंमत नाही अशा परस्परविरोधी कात्रीत सापडलेला हा वर्ग संपत्तीवर किंवा कष्टाळूपणा या वास्तवावर जगत नाही, तर अब्रू या भ्रामक वस्तूवर जगतो. ३) इंग्रज राजवटीमध्ये (राज्यकर्त्यांविरूद्ध) 'जनतेचे नेते' ही बंडखोर भूमिका बजावणारा हा मध्यमवर्ग स्वातंत्र्यप्राप्तीनंतर बदलला. इंग्रजी भाषा व सरकारी नोकऱ्या यांच्या आधारावरचे त्याचे भ्रममूलक नेतृत्व समाजाने झुगारून दिले; परंतु हा वर्ग त्याबद्दल जागरूक नाही. दोन्ही काळांतील प्रक्रियांमुळे मध्यमवर्गाने आपले नुकसानच करून घेतले, तथापि स्वातंत्र्यपूर्व काळात त्यामुळे समाजाचे हित तरी साधले. आता तेही साधत नाही. 'पश्चिम प्रामाण्या'मध्ये गुरफटून जाऊन त्याने आपल्या रूढींचे भंजन करण्यात धन्यता मानली. परंतु तेवढ्याच अंधविश्वासाने पाश्चात्त्यांच्या रूढी उचलल्या. ४) ज्ञानापेक्षा प्रमाणपत्राला महत्त्व, बहुश्रुततेचा अभाव, इंग्रजी, चांगले बोलणे तर सोडाच साधे बोलणे सुद्धा चांगले नाही, चेहऱ्यावर हसू नाही, सदैव त्रासल्याचा आव आणणे. यासारख्या वैशिष्ट्यांचे प्रदर्शन करणाऱ्या (महाराष्ट्रीय) तरुणांना कोण नोकरीवर ठेवून घेणार ? नोकऱ्यांचे महत्त्व अशासाठी की, व्यापारधंद्याला आवश्यक ते कसब महाराष्ट्रातील लोकांपाशी नाही.

दोषदिग्दर्शनाबरोबरच ते मार्गदर्शनही करतात.

१) 'प्रगतीच्या आड येणाऱ्या रूढी तोडा' हा लोकहितवादींचा उपदेश ते वारंवार देतात. २) शिक्षणात बाह्य भपक्यापेक्षा शिक्षकांच्या क्षमतेला महत्त्व द्या. परीक्षेच्या तयारीसोबत ज्ञानाची ओढ ठेवा. ३) नोकरी करणे अपरिहार्य असल्याने अनिच्छेने व कुरकुरत करण्यापेक्षा इमानाने व हसतमुखाने करा. ४)समाजातल्या इतर घटकांच्या अडीअडचणी

समजावून घेऊन त्यांना मदत करण्यासाठी झीज व त्याग सोसायला शिका.

याच लेखात कुटुंबसंस्थेबद्दलचे त्यांचे विचार आहेत. १) कुटुंबातील वृद्धांची आबाळ झाली, त्यांचे महत्त्व नष्ट झाले तर कुटुंबातील बालकांचे व पर्यायाने समाजाचेच नुकसान होते. २) घर म्हणजे केवळ जेवण्याझोपण्याची जागा नसून संस्कृतिशिक्षण व भावनांचे पोषण ही घरांची-कुटुंबाचीच कामे आहेत.

दिल्लीतील महाराष्ट्र सांस्कृतिक केंद्र, साने गुरुजींची 'आंतरभारती' संस्था. संस्थानिकांची स्वतंत्र भारतातील संभाव्य उपयुक्तता अशा अनेक विषयावर श्रीकेक्षींची मते या लेखात येतात.

जातिविषयक विचार- या संदर्भात त्यांचा वैदिक धर्माचा अभिमान दिसून येतो, पण तो अंधविश्वास म्हणण्याएवढ्या टोकाचा नाही. वैदिक धर्मातून आलेल्या परंपरांचा व्यावहारिक वारसा कृषिप्रधान समाजरचनेपासून प्राप्त झाला आहे. हा दुसरा धागा ते नजरेआड करीत नाहीत. जातिविषयात ब्राह्मणांवर निष्कारण दोषारोप होत आहेत. राष्ट्रीय ऐक्य आणि सामर्थ्य यासाठी जातिभेदविरहित समाजरचना हवी यावर ते ठाम होते. प्राचीन ग्रंथांमध्ये वर्णन केल्याप्रमाणे समाजरचना चार वर्णांवर खरोखरच आधारित होती का असा प्रश्न विचारून त्याचे ते 'नाही' असे ठाम उत्तर देतात. कारण या व्यवस्थेचा आजच्या हजारो जातींच्या व्यवस्थेशी संबंध दाखवता येत नाही. इंग्रजांच्या 'फोडा व झोडा' नीतीचा भाग म्हणून त्यांनी जातीजातीत झगडे लावून दिले. त्यांच्या पूर्वीच्या राजवटीत हे भेद नव्हते. जातिसंस्थेचे मूळ कोणा एका व्यक्तीने दिलेल्या आदेशात किंवा एखाद्या गटाने केलेल्या ठरावात नाही; तर विविध समूहांनी एकत्र रहाण्यासाठी केलेली खटपट यात आहे. जातीयतेचे मूळ महत्त्वाचे नसून परिणामांशी झगडणे आवश्यक आहे. ब्राह्मण आणि जातीयता याविषयीची त्यांची मते मुळातूनच - विशेषतः ब्राह्मणांविषयी चुकीचे समज असणाऱ्यांनी वाचावीत अशी आहेत.

श्रीकेक्षींच्या अनेक लेखांचे एक वैचारिक सूत्र घेऊन त्यांचे संकलन करण्यात, त्यातून एकजिनसी वैचारिक चित्र निर्माण करण्यात, कालबाह्यता दाखविण्यात डॉ. गोरे अत्यंत यशस्वी झाले आहेत.

डॉ. मृणालिनी शहा यांनी 'श्रीकेक्षींचा स्त्रीविषयक दृष्टिकोन' दाखवून दिला आहे. त्यातील काही भाग असा- त्यांच्या या विषयावरील लेखांची विभागणी केली तर स्त्रीजीवना संबंधीच्या आठ-नऊ विषयांवर त्यांनी विवेचन केलेले आढळते.

१) स्त्रियांना महत्त्व प्राप्त झाले आहे याचे इंगित त्यांच्या शरीरबळात नाही की बुद्धिबळातही नाही. ते इंगित त्यांच्या आकर्षकपणात आणि सदयपणात आहे. (आकर्षकपणा म्हणजे सौंदर्य नव्हे.) यामुळेच त्या स्वतः प्रिय होतात आणि मानवी जीवन सह्य, सौम्य आणि प्रिय करून सोडतात. २) व्यवहारी असल्याने स्त्रिया दुसऱ्याच्या दुखण्यात पुरुषांइतका पुढचा विचारही करत नाहीत. त्या लहानसहान प्रसंगी हळवेपणाच्या आहारी जातील; पण साऱ्या जन्माचे नफानुकसान ज्यात गुंतले आहे अशा प्रसंगी पुरुषाच्या मानाने मन घट्ट करतील. ३) कुणाकरिता तरी जगणे हा स्त्रीचा स्वभाव असल्याने कोणी ना कोणी प्रेमाचे ग्राहक, सेवेचे ग्राहक तिला सदैव घट्ट धरून ठेवावे लागतात. नवरा आणि मुले हे तिच्या प्रेमाचे आणि सेवाशुश्रुषेचे प्रमुख ग्राहक असतात. पुरुष अरेरावी करतो म्हणून नव्हे, मुले अजाण-परावलंबी असतात म्हणून नव्हे, तर 'स्त्रीच्या पोटात प्रेमाचा दुर्दम्य साठा' असतो म्हणून स्त्री दुसऱ्या करता हसतमुखाने खपत असते. ४)स्त्रियांना समजावून घेणे, त्यांच्याबद्दल कृतज्ञता आणि अभिज्ञता बाळगणे हाच स्त्रीच्या सेवाप्रधान, त्यागप्रधान जीवनाला खरा प्रतिसाद होय. ५) पुरुष पुष्कळदा स्त्रीचा त्याग ही आपली वडिलार्जित मिरास समजून चालतो. या त्याच्या वृत्तीमुळे पुष्कळदा स्त्रियांचा छळही होतो. पण त्यावरचा इलाज म्हणजे स्त्रियांना पुरुषांप्रमाणे ऐदी, राठ आणि उनाड बनवणे हा नव्हे; तर त्यासाठी पुरुषांना अधिक दाक्षिण्य, अभिज्ञता आणि कृतज्ञता शिकवण्याची गरज आहे. घराचे व गृहिणीचे महत्त्व ओळखून स्वतःच्या घरात कृतज्ञतेने आणि दाक्षिण्याने वागणारा 'नवा पुरुष' घडणे गरजेचे आहे. ६) स्त्रियांकडून अशा पुरुषाची मागणी होताना दिसत नाही. ७) स्त्रीशिक्षणाचे उद्दिष्ट 'स्त्रियांना पुरुषसदृष करणे' असे ठेवले गेल्यामुळे कित्येक स्त्रियांचे नुकसान तर झाले आहेच, पण एकंदर समाजाचे नुकसान

त्याहून अधिक झाले आहे. स्त्रीची मनोरचना घडवण्याचे शिक्षण किंवा स्वतःचे स्त्रीत्व ओळखण्याचे वळण (ट्रेनिंग) ज्या शिक्षणात आहे असा शिक्षणक्रम हवा.

नोकरी करणाऱ्या स्त्रियांचे प्रश्न, सुरक्षिततेचा प्रश्न, स्त्रीदाक्षिण्याची आवश्यकता आणि स्त्रीविमोचन, स्त्रिया आणि राजकारण, अशा अनेक विषयांवर श्रीकेक्षींचे विचार या प्रदीर्घ लेखात येतात.

डॉ. शकुंतला क्षीरसागर यांनी 'शैलीकार श्री. के. क्षीरसागर' हा लेख त्यांच्या इंदूर येथील शारदोत्सवात जानेवारी १९६० मध्ये केलेल्या लिखित भाषणाच्या आधारे लिहिला आहे. पुनरुक्ती, आदिस्थानी शब्दाची किंवा शब्दसमूहाची आवृत्ती, अंत्यस्थानी शब्दांची किंवा शब्दसमूहाची पुनरावृत्ती, नवशब्दनिर्मिती, रूढ शब्दांच्या अनुकरणाने घडवलेले नवे शब्द, समानार्थी शब्दांमधील निवडीमागची दृष्टी, सर्वनामांच्या उपयोगातील साक्षेप, ही त्यांच्या शैलीची वैशिष्ट्ये सोदाहरण दिली आहेत.

या गौरवग्रंथाचा समारोप पुढील परिशिष्टांनी होतो.

१) उमरखय्यामची फिर्याद : एक टिपण-डॉ. चंद्रशेखर बर्वे.
२) श्रीकेक्षी यांचा वाङ्मयीन जीवनपट.
३) श्रीकेक्षी यांच्या ग्रंथसंपदेची व तीवरील परीक्षणांची सूची.
४) श्रीकेक्षी यांच्या जन्मशताब्दीच्या कार्यक्रमांची

संक्षिप्त नोंद.

५) श्रीकेक्षी यांच्या जन्मशताब्दी उत्सवात त्यांच्यावर प्रकाशित झालेल्या लेखांची नोंद ५ नोव्हेंबर २००० ते ६ नोव्हेंबर २००१.

६) श्रीकेक्षी यांच्या स्मृतिदिनाच्या कार्यक्रमांची संक्षिप्त नोंद.

***

श्रीकेक्षींनी समीक्षा लेखन केले त्याकाळात नवसाहित्य (कथा, कविता) निर्माण होत होते. त्याबाबतीत श्रीकेक्षींनी काहीच लेखन केले नाही (आणि मर्ढेकरांवर टीका केली.) याबद्दल गं. ना. जोगळेकर आणि व. दि. कुलकर्णी यांची नाराजी दिसून येते. अशावेळी संस्कृत सुभाषिताचा उत्तरार्ध आठवतो. 'सा किं न रम्या स च किं न रन्ता बलीयसी केवलमीश्वरेच्छा' तेव्हा या बाबतीत श्रीकेक्षींची इच्छा, त्यांच्या मनाचा कल निर्णायक मानणे योग्य.

श्रीकेक्षींचे सर्वच लेखन उच्च बौद्धिक पातळीवरचे आहे. त्यामुळे 'आश्चर्यवत् पश्यति कश्चिदेनम्' असेच त्याकडे बहुसंख्य व्यक्तींनी पाहिले असावे. कदाचित् याच कारणामुळे ते प्रेरक ठरून साहित्यात किंवा साहित्य टीकेत श्रीकेक्षीपंथ निर्माण झाला नाही. 'व्यक्तींचे महत्त्वमापन' करणारे त्यांच्या लेखनासारखे लेखन रुजले नाही– जरी खऱ्या सुवर्णतुला होत राहिल्या आणि रत्नांसाठीच सागरमंथने झाली तरीही ! अनेक क्षेत्रात त्यांनी सतत जागल्याची भूमिका घेतली, पण त्यांची 'हुश्शार' आरोळी विरूनच गेली. श्रीकेक्षींचे समाजचिंतन, संस्कृतिविचार, जातिविषयक विचार किती उच्च दर्जाचे आहेत ! पण डॉ. सुधांशु गोरे त्यातील त्रुटी आज दाखवतात. उद्या जातिविषयक काही क्रांती झाली आणि तिचा इतिहास लिहिला गेला तर 'जातींमागे राजकीय स्वार्थ आणि ढोंगीपणा दडलेला आहे' हे श्री. के. क्षीरसागर या विचारवंताने पूर्वीच सांगितले होते.' असे एक वाक्य येईल. अश्लीलताविरोधी चळवळीत त्यांनी दुटप्पी, बोटचेपी भूमिका घेतली नाही, तर कर्त्याची भूमिका वठवली. अनेकांना त्यांचा धाक बसला आणि मराठी मासिकांचा दर्जा बदलला. पण अश्लीलता आहे तिथेच आहे आणि आता ती हिंदी इंग्रजी मासिकांतून अखिल भारतीय झाली आहे. माझ्या अभ्यासासाठी मी त्यांचा अश्लीलता विचार वाचला; पण मला तो अपूर्ण वाटला आणि काही बाबतीत त्याज्यही वाटला. 'स्त्री सौंदर्याचाच काय पण कोणत्याही सौंदर्याचा उपयोग आम्ही एखाद्या उत्तेजक पेयासारखाच करतो असं मला वाटते.' 'स्त्रीसौंदर्यामुळे आमची रसिकता पेट घेते.' (मनोहर मासिक ऑक्टोबर ६३) चांगल्या मानलेल्या वृत्तपत्रांनी हा विचार सचित्र उचलून धरला आहे ! दृक् माध्यमांचे काही विचारूच नये ! यात दोष कुणाचा ? दोष द्यायचाच झाल्यास तो बदलणाऱ्या काळाला आणि अभिरूचीला द्यावा लागेल. पण काळ निर्विकार असतो. गुण-दोष हे मानवी विकार आपण त्यावर लादतो. तो मात्र आपले काम करीत पुढे जातो. काल परवाच होऊन गेलेल्या लोकहितवादी, आगरकर, फुले यांचे काय झाले ? त्यांचा उपयोग पीएचड्यांसाठी फार मोठा आहे ! श्रीकेक्षी या कामात मात्र फारच उपयुक्त ठरतील. पुढच्या काळात कदाचित् त्यांचे विचार नुसते उतरून काढूनही डॉक्टरेट मिळण्याची सोय असेल. एवढेच यश श्रीकेक्षींना रगड...

डॉ. शकुंतला क्षीरसागर या आधुनिक पतिव्रतेविषयी सुमति कुलकर्णी यांचे उद्‌गार वाचल्यावर मला कुसुमाग्रजांची 'पृथ्वीचे प्रेमगीत' कविता आठवली. त्या मनस्वी प्रेयसीला तिचे प्रेय मिळणे अशक्यच होते. ते या प्रेयसीला अल्पकाळ मिळाले. मात्र त्या प्रेयाची अखंड पूजा दोघींनाही समानच आहे. अशा व्यक्तीच्या हातून हा स्मृतिग्रंथ अशा हृद्य स्वरूपात निघणे अपरिहार्यच. श्रीकेक्षींबद्दलच्या शकुंतलाबाईंच्या भावना हळव्या आहेत आणि त्या तशा असणे स्वाभाविक आहे. पण त्यांचा मोठेपणा असा की त्या त्यांनी 'विकार' होऊ दिल्या नाहीत. त्यामुळे श्रीकेक्षींच्या त्रुटी दाखवणारे लेखही त्यांनी निर्लेपपणे स्वीकारले आहेत.

❖❖❖

**अ. द. मराठे**

६ मंजूषा, विकास हौसिंग सोसायटी, शास्त्रीनगर, डोंबिवली (प.) ४२१२०२ मोबा. : ९८५०२४१९१३

●

परीक्षित पुस्तक : श्री. के. क्षीरसागर : व्यक्ती, टीकादृष्टी आणि टीकासृष्टी, संपादक : डॉ. शकुंतला क्षीरसागर, प्रकाशक : शशिकला उपाध्ये, चंद्रकला प्रकाशन, ३९/५८४, लोकमान्यनगर, नवी पेठ, पुणे ४११०३०. पृष्ठे : २६४







# नाट्यसंगीत : नाटकातील आणि मैफिलीतील

## - एक तौलनिक परामर्श

सौ. धनश्री खरवंडीकर

संगीत नाटक व नाट्यसंगीत हा खास मराठी मातीतून निर्माण झालेला दृश्य-श्राव्य असा कलाप्रकार आहे. महाराष्ट्राची थोर सांस्कृतिक परंपरा म्हणून एक अत्युच्च मानबिंदू आहे. नाट्यसंगीत हे मुळात नाटकातच सादर करण्यासाठी अस्तित्वात आले. कारण नाटकातील त्या त्या प्रसंगाची तीव्रता वाढविण्याच्या, उत्कटता वाढविण्याच्या उद्देशाने नाट्यमयरित्या सादर केलेले ते नाट्यगीत असते. परंतु नाट्यसंगीत हा मैफलीचा केंद्रबिंदू ठरावा एवढी प्रचंड लोकप्रियता त्याने मिळविली.

महाराष्ट्रात संगीत नाटकांची परंपरा १५० वर्षांपासून दिसून येते. विष्णुदास भावे यांनी 'सीतास्वयंवर' नाटकाचा पहिला प्रयोग ५ नोव्हेंबर १८४३ रोजी सांगली येथे सादर केला. तेव्हापासून संगीत रंगभूमीची वाटचाल सुरू झाली आणि महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनात संगीत नाटकांनी आपले वेगळे असे स्थान निर्माण केले.

बाळकृष्णबुवा इचलकरंजीकरांनी शास्त्रोक्त संगीताची गंगा महाराष्ट्रात आणली. त्यादरम्यान संगीत नाटकाचा एक आगळावेगळा घाट महाराष्ट्रात आकार घेत होता. शास्त्रीय संगीत हे श्रीमंत संस्थानिकांच्या आश्रयाने हळूहळू विस्तारित होत होते. मध्यम वर्गाचे कीर्तनाद्वारे मनोरंजन होत होते, तर गरीब बहुजनसमाज तमाशा, गोंधळ अशा लोकसंगीताच्या प्रकारांतून संगीताचा आनंद घेत होता. या तिन्ही वर्गांना एकत्र आणण्याचे काम संगीत नाटकाने केले. नाटकातील नाट्यसंगीताने आनंद तर दिलाच, त्याशिवाय शास्त्रीय संगीताची आवड जनसामान्यांमध्ये निर्माण झाली. त्यामुळे महाराष्ट्रात शास्त्रीय संगीत ऐकणाऱ्या रसिकांची संख्या वाढत गेली. महाराष्ट्रात संगीतातील दर्दी लोकांचा एक सुसंस्कृत समाज तयार होऊ लागला. संगीत नाटकांतील पदांच्या आकर्षक व सोप्या चालींमुळे सर्वसामान्यांच्या तोंडी ही नाट्यपदे सर्रास घोळू लागली. त्याकाळी टी.व्ही., रेडिओ ही करमणुकीची साधने नव्हती. संगीत नाटके व नाट्यसंगीत हे त्यावेळी लोकांच्या करमणुकीचे एकमेव साधन होते. त्याकाळी रात्ररात्रभर संगीत नाटके चालत असत. किर्लोस्करी नाटकांतील नटांचे गायन, यवतेश्वरांच्या नाटकांतील गायक नटांचे गायन, कोल्हटकरांच्या नाटकांतील संगीतावर उर्दू, पारशी रंगभूमीवरील उडत्या चालींचा प्रभाव, उत्तरेकडील गवयांचे महाराष्ट्रात आगमन या सर्वांमुळे नाट्यसंगीताने अपार लोकप्रियता मिळविली. याच सुमारास महाराष्ट्राच्या रंगभूमीवरील संगीतात गायकी दृष्टीने भिन्नत्व असलेल्या विविध परंपरा निर्माण झाल्या. उदा. १) नानासाहेब जोगळेकरांची गायकी, २) बालगंधर्वांची गायकी, ३) केशवराव भोसले यांची गायकी, ४) मा. दीनानाथ यांची गायकी. इ. १९०० पर्यंतच्या कालखंडात बाळकृष्णबुवा, अल्लादियाखाँ, नत्थनखाँ, अब्दुल करीमखाँ वगैरे घरंदाज गायक महाराष्ट्रात स्थायिक झाले होते. रसिकांना या विविध गायकांचा परिचय झाला व गवई गायनाची गोडी लागली. १९०१ नंतर निर्माण झालेल्या नाट्यसंगीताच्या गायकीच्या स्वरूपाचा स्वीकार करण्याइतपत श्रोत्यांची क्षमता वाढली. त्यानंतर नाट्यसंगीतातही नाविन्याची अपेक्षा बाळगली गेली. नाटकातील संगीताच्या वाढत्या लोकप्रियतेमुळे मैफिलीतही आपल्याला अवीट गोडीचे नाट्यसंगीत ऐकायला मिळावे अशी श्रोत्यांची मनोभूमिका तयार झाली. त्यानुसार भास्करबुवांनी मैफिलीत प्रथम नाट्यसंगीत म्हणण्यास सुरूवात केली असा उल्लेख सापडतो.[१] परंतु त्याहीपूर्वी १९०३ मध्ये आप्पाजी विष्णू कुलकर्णी यांनी असे लिहून ठेवले आहे की, गवयी लोक बैठकीत गाऊ लागले म्हणजे त्यांना त्याकाळात सौभद्रातील पदे म्हणण्याचा आग्रह होत असे. मेजवानीच्या प्रसंगी सौभद्रातील एखादे पद हटकून म्हणण्यात येई.[२] याचाच अर्थ फार पूर्वीपासून म्हणजे

सौभद्राच्या काळापासून मैफलीत नाट्यपद म्हणण्याची प्रथा सुरू आहे.

शास्त्रीय संगीत परंपरा व मराठी संगीत नाटकांची परंपरा या दोन्ही एकमेकींच्या साहाय्याने वृद्धिंगत होत गेल्या. नाट्यसंगीताने पुढे एक नवा इतिहास घडविला. अशाप्रकारे नाट्यसंगीताच्या ऐन बहराच्या काळात मोठमोठ्या शास्त्रीय गायकांनाही नाट्यसंगीत गाण्याचा मोह होऊ लागला. परिणामी नाट्यसंगीत हे मैफिलीतूनही लोकप्रिय होऊ लागले. परंतु नाट्यसंगीताचे नाटकातील स्वरूप आणि मैफिलीतील स्वरूप यात कलावंतांच्या सादरीकरणानुसार फरक दिसू लागला. सादरीकरणात विशिष्ट घराण्याच्या गायकीच्या खुणा दिसू लागल्या. त्यानुसार दोन्हींच्या सादरीकरणात काळानुरूप परिवर्तने होत गेली. नाट्यसंगीत हे भावात्मकतेकडे झुकत होते तर मैफिलीतील नाट्यसंगीतात संगीताच्या शास्त्राकडे लक्ष दिले जाऊ लागले. अशारितीने दोन्हींच्या सादरीकरणात दिसू लागलेल्या फरकामुळे, वेगळेपणामुळे नाट्यसंगीत व मैफिलीतील नाट्यसंगीत या दोन्हींचा तौलनिक अभ्यास करणे महत्त्वाचे आहे असे वाटते.

नाट्यप्रसंगाला अनुरूप व प्रसंगाची उत्कटता वाढविणारे संगीत म्हणजे नाट्यसंगीत होय. नाट्यसंगीत नाटकाच्या कथानकातूनच विकास पावते. नाटकाचा एक अविभाज्य अंग असते. तरीही नाटकाच्या रंगमंचावरून वेगळे करून ते मैफिलीत सादर केले जाते तेव्हा त्याचे रूप स्वतंत्र, स्वयंपूर्ण असते व ते लोकप्रिय ठरते. एक स्वतंत्र प्रकार म्हणून मैफिलीत सादर होते. नाट्यसंगीतात स्त्रीगीतापासून, कानडी चालीपासून लावणी, कटाव-कीर्तनातील पदे ते शास्त्रीय चीजांपर्यंत सर्व तऱ्हेच्या संगीताचा उपयोग केला गेला आहे. सर्वसमावेशक असे नाट्यसंगीताचे स्वरूप आहे. परंतु नाटकातील संगीत आणि मैफिलीतील नाट्यसंगीत या दृष्टिकोनातून विचार करत असताना दोन्हींचे अंतर्भाव, त्या पदांचा विस्तार करण्याची वेगवेगळी पद्धती, दोन्हींकडे गाताना लागणारा सामर्थ्यशाली अभिनय व कुशल गायक, योग्य साथीदारांची मिळणारी संयमित साथ या सर्व गोष्टींचा योग्य मागदर्शनपर व सखोल अभ्यास करणे आवश्यक आहे. याअनुषंगाने प्रथम नाट्यसंगीताचा विचार करूया.

**नाट्यसंगीत** - दशावतार, भारूड, गोंधळ, कीर्तन इ. लोकनाट्य व लोकसंगीतावर, त्यातील संगीत कोषावर सुसंस्कार होऊन त्यातूनच पुढे संगीत नाटकाची-नाट्यसंगीताची निर्मिती झाली. पहिल्या काही वर्षात किर्लोस्कर, देवल, कोल्हटकर हे नाटककारच नाट्यपदांना चाली देत असत. पण याकाळात कथानकाच्या दृष्टीने आशयाच्या ओघाने आलेले संगीत एवढाच उद्देश होता. रंगमंचावरील नाटकात गाणे एवढाच हेतू होता. किर्लोस्करी नाट्यपदांची गायकी ललित स्वरूपाची असून रागदारी संगीताच्या वळणावर त्याचा विस्तार होत नसे. मैफिलीतील गायकी त्यात अपेक्षित नव्हती. खाडिलकरांच्या स्वयंवर-मानापमानापासून संगीत दिग्दर्शनाची जबाबदारी घेऊन रंगभूमीला भास्करबुवा बखले, वझेबुवा, गोविंदराव टेंबे, मास्तर कृष्णराव यांनी संगीत देऊन समृद्ध केले. याकाळात रागदारी संगीताच्या वळणावर नाट्यपदांच्या गायकीचा विस्तार होऊ लागला. 'नाथ हा माझा', 'मम आत्मा', 'चंद्रिका ही जणू', इ. पदांमुळे शास्त्रीय संगीत मराठी माणसांच्या घराघरात जाऊन पोचले. शास्त्रीय संगीतासारख्या अवघड वाटणाऱ्या रागदारीची आवड सर्वसामान्य लोकांना नाट्यसंगीताच्या माध्यमातून सहज होऊ लागली. १९३१ ला चित्रपटांच्या आगमनामुळे मराठी संगीत नाटकांवर बराच परिणाम झाला. उतरती कळा लागायला सुरूवात झाली. याकाळात जुनी संगीत नाटके व भावगीत वळणाची सामाजिक संगीत नाटके (उदा. सं. कुलवधू. इ.) यांनी रंगभूमी कशीतरी जिवंत राहिली होती. १९४३ च्या शतसांवत्सरिक उत्सवापासून सगळीकडे संगीत नाटकांचे प्रयोग होऊ लागले. उत्साहाचे वारे संचारले. रंगभूमीला पुनर्जीवन मिळाले. नाट्यसंगीताला नवीन दिशा देण्याचे फार मोठे प्रयत्न वसंत देसाई, श्रीधर पार्सेकर, केशवराव भोळे, मा. कृष्णराव, छोटा गंधर्व, राम मराठे इ. संगीतकारांनी केले.

संगीत नाटक हा मराठी रंगभूमीचा एक अमोल वारसा

आहे. अभिजात संगीताला लालित्याची मर्यादा घालून त्याचा नाट्यपरिपोषासाठी उपयोग करून घेणे हे मराठी संगीत नाटकाचे मूलतत्त्व आहे. नाटकातील घटनात्मक, संघर्षात्मक, उत्कर्षाची उत्कटता, तीव्रता वाढविण्यासाठी गाण्याचा उपयोग झाला पाहिजे. रसाचा उत्कर्ष साधणे हे नाटकातील पदाचे उद्दिष्ट असते, असायला हवे.

नाटकातील भावार्थ, शब्द व स्वर या दोन्हींच्या साहाय्याने फुलविणे हे नाट्यसंगीताचे मुख्य ध्येय होय. नाटकातील संगीत हे उभ्याने म्हणावे लागते. नाटकच मुळात उभे राहूनच सादर केले जाते. नाटकांत त्या त्या पात्राला साजेशी, भूमिकेला अनुरूप अशी वेशभूषा असते. त्या वेशभूषेसहित नाट्यपद सादर केले जाते. नाटकातील गद्याला पद्याची जोड देताना काही संकेत पाळावे लागतात. त्यात, पदामागील संवादाची लय व पद सुरू करताना पदाची लय, यात सुसूत्रता असावी. कथानक संगीताच्या अतिरेकाने कोठेही रेंगाळता कामा नये, असा पदाचा विस्तार करणे आवश्यक असते. गायन माफक प्रमाणात करणे आवश्यक असते. कथानकातील एकसंधपणा कायम राखला गेला पाहिजे. प्रत्येक पदातील स्वरांचा सूक्ष्म दर्जा, त्यांचे लगाव इ. दाखवत न बसता 'भाव' निर्माण होईल याकडे लक्ष दिले पाहिजे. काही पदे अशी असतात की त्या पदांच्या सादरीकरणात अभिनयाची व त्यातील भावात्मकतेची बाजू सांभाळणे तितकेच महत्त्वाचे असते. उदा. 'नाही मी बोलत' किंवा 'दूती नसे ही माला' या पदांमध्ये भामिनी व कुसुम यांच्यातील अभिनय व त्याला साजेसा पदाचा विस्तार करणे आवश्यक आहे. धैर्यधर व भामिनी यांच्यातील काल्पनिक प्रेमकलह 'मानापमान' नाटकाच्या दुसऱ्या अंकातील एका प्रवेशात दाखविला आहे. तो प्रेमळ संवाद भामिनी तिच्या मैत्रिणीला-कुसुमला सांगते. ते सांगताना मी त्यांच्याशी बोलणार नाही यातील जो लटका राग आहे, तो 'नाही मी बोलत' या पदात दाखविता आला पाहिजे.

नाटकातील संगीताचे सादरीकरण करताना ऑर्गन, तबला, सारंगी ही साथीची वाद्ये असतात आणि साथसंगत करणारे कलाकार रंगमंचाच्या बरोबर समोर खालच्या खास जागेत (हौद्यात) बसलेले असतात. हे साथीदार गायक कलाकारापासून लांब असतात. त्यामुळे पदाच्या आधीच्या संवादाचा सूर वेगळा असणे आणि पदाचे सादरीकरण करताना त्या गायकाचा सूर यात तफावत होऊ शकते. पण तसे होऊ नये यासाठी मनातच एक सूर निश्चित केले पाहिजे व ऑर्गनचा सूर मिळाल्यावर पद लगेच सुरू केले पाहिजे. तेथे वेळ घालवून चालत नाही. नाटकातील पदामागचा संदर्भ व त्यातील रागाचा विचार लक्षात घेऊन गायले गेले पाहिजे. सुडौल शारीरिक हालचाली, चेहऱ्यावरील योग्य हावभाव, शेजारील पात्रांशी सुसंवाद साधणे या गोष्टींकडेही नाट्यपद म्हणताना लक्ष दिले पाहिजे. नाटकात नाट्यपद एकाच जागी स्थिर राहून म्हणता येत नाही. त्या त्या परिस्थितीनुसार, प्रसंगानुसार सादर करावे लागते. नाट्यपदांत साकी, दिंडी, कटाव, कीर्तनातील पदे, लावणी, शास्त्रीय चीजांवर आधारित अशा सर्व प्रकारांचा अंतर्भाव होतो.

**मैफिलीतील नाट्यसंगीत** - कोणतीही कला परिवर्तनशील असते. काळानुरूप त्यात बदल होत जातो. संगीताच्या विकासाचेही असेच टप्पे आहेत. प्राचीन वेदकाळात यज्ञयागात गुंतलेला संगीताचा प्रवाह लोकसंगीत, जातिगायन, ध्रुपदगायन, ख्यालगायन अशा वळणांनी मुख्यतः बदलत आजच्या अवस्थेत आला आहे. ज्या शास्त्रीय संगीताच्या मैफिलीत एकेकाळी ख्यालाव्यतिरिक्त ठुमरीगायनासारखे सुगम संगीत प्रकार सादर करणे कमीपणाचे मानले जाई, तीच शास्त्रीय संगीताची मैफल केवळ ठुमरीच काय पण नाट्यसंगीत, भक्तीगीते यांनीसुद्धा सजविली जाऊ लागली आहे.

मैफिलीतील नाट्यसंगीतावर शास्त्रीय संगीताचा जास्त प्रभाव दिसतो. त्यात भावात्मकतेला महत्त्व नसून शास्त्राला महत्त्व असते, नाट्याला गौण महत्त्व असते. मैफिलीत नाट्यसंगीत गात असताना त्यावर कोणतेही बंधन नसते. अमूकच एक वेशभूषा करणे अपेक्षित नसते. कथानकाची पार्श्वभूमी नसते. केवळ नाटकातील संगीताचा पुरेपूर समाधान मिळेपर्यंत गायकीच्या मुक्त वातावरणात आस्वाद

घ्यायचा असतो. मैफिलीत उभे राहून गायचे नसून एका जागी स्थिर बसायचे असते. तब्येतीत आपले नाट्यपद रंगवावे. पदांच्या लयी थोड्या संथ असतात. नाटकातील पदांच्या लयी त्यामानाने थोड्या चढ्या असतात. मैफिलीत साथीदार हे गायकाच्या डावीकडे व उजवीकडे असे अगदी जवळच बसलेले असतात. त्यामुळे जास्त भरीव सूर मिळतो. मैफिलीत तंबोरा, तबला, हार्मोनिय़म, कधीकधी ऑर्गनही साथीला घेतला जातो. सुरूवातीला आलापी करून पद सुरू करणे या गोष्टी करता येतात. नाटकांत मात्र संवाद झाल्यावर लगेच क्षणाचीही उसंत न घेता पद सुरू करावे लागते. माईकही आपल्याजवळ असल्याने आवाज पोचायचा प्रश्न येत नाही. नाटकात गायक कलाकार पद म्हणताना पूर्ण रंगमंचावर वावरत असल्याने ज्या जागी असेल तिथून आवाज पोचावा लागतो. आवाजाची फेक तशी जोरकस असावी लागते. उभे राहिल्यामुळे एक प्रकारचा जोश, चैतन्य पद सादर करताना आपोआपच निर्माण होते. मैफिलीत मात्र बसूनच गायचे असते.

मैफिलीत विस्तारक्षम असणारी पदेच जास्त करून गायिली जातात. पदांच्या विस्ताराला भरपूर वाव असतो, जो नाटकात नसतो. मैफिलीत किंवा नाटकांत कोठेही नाट्यसंगीत गात असताना त्यात दुसऱ्या रागांची मिश्रणे करण्यास मुभा असते, विस्तारक्षम असणारी पदे उदा. 'नाथ हा माझा', 'मधुमधुरा' इ. याशिवाय अभिनयगीते ही नाटकातच उठाव आणतात. मैफिलीत रंग भरत नाहीत म्हटली तरी योग्य न्याय मिळत नाही. म्हणून अशी पदे शक्यतो मैफिलीत सादर केली जात नाहीत. उदा. 'लग्नाला जातो मी', 'अवघे पाऊणशे वयमान' इ. परंतु आधी सांगितल्याप्रमाणे 'नाही मी बोलत', 'दूती नसे ही माला' ही पदे जरी ती अभिनयगीते असली तरी मैफिलीत रंगत आणतात. कारण त्यातील दादऱ्याच्या वैशिष्ट्यपूर्ण लयी, त्यातील डौल हाच मुळात शृंगारिकतेकडे आपोआप झुकतो. शिवाय स्वरलयींच्या निरनिराळ्या चमत्कृती व दुसऱ्या रागांचे त्यात कौशल्याने केलेले मिश्रण यामुळे रसिक प्रेक्षकांना कितीही वेळा ती मैफिलीत हवीहवीशी वाटतात.

मैफिलीच्या मांडणीत सुरूवातीला विलंबित ख्याल, द्रुत ख्याल असा एखाद्या रागाचा विस्तार झाल्यानंतर नाट्यसंगीत सादर केले जाते. केवळ नाट्यसंगीताचीही मैफिल केली जाते. त्यात वेगळ्या पद्धतीची मांडणी असते. म्हणजे सुरुवातीला नांदी किंवा संथ लयीतील पद, मग हळूहळू मध्यलयीतील, मग चढ्या लयीतील पदे अशी मांडणी असते. साधारणतः पहिला अर्धा किंवा त्यापेक्षा जास्त भाग षड्जातील पदे आणि त्यानंतर मध्यमातील पदे जी अधिक रंगतात असा क्रम ठेवला जातो. बहुतेक करून शेवट भैरवीनेच होतो.

**आदर्श सादरीकरण** : नाट्यसंगीत नाटकातील असो वा मैफिलीतील असो, त्यासाठी सामर्थ्यशाली अभिनय व कुशल गायक हवेत. संवादातील अचूक शब्दफेक, अभिनयातील बारकावे यांचा अभ्यास हवा. दोन्हींच्या सादरीकरणात अभिनय हा असतोच परंतु नाटकांत भावात्मक, रसपरिपोषक सांगीतिक अभिनय असावा. आणि मैफिलीत गायकीयुक्त शास्त्रोक्त सांगीतिक अभिनय असावा. नाटकातील नाट्यसंगीत अनुभवण्यासाठी चांगले प्रेक्षक हवेत तर मैफिलीतील नाट्यसंगीत ऐकण्यासाठी चांगले रसिक श्रोते हवेत. याशिवाय नाटकात पद सादर करताना उभे राहण्याची पद्धत, त्या त्या व्यक्तिरेखेनुसार गाण्याचा ढंग कसा असावा, त्याबरोबर पदातील शब्दांची मोडतोड होऊ न देता अचूक फेक, आवाजाची योग्य फेक, योग्य लगाव, चेहऱ्यावरील योग्य हावभाव, मैफिलीत गाताना बसण्याची पद्धत, माईकचा नाटकात व मैफिलीतील नाट्यसंगीताच्या सादरीकरणात योग्य वापर, साथीदारांना दिलेली दाद, मैफिलीत व नाटकात गाताना मिळणारी योग्य साथ व योग्य साथीदार या सर्व गोष्टींचा योग्य मार्गदर्शनपर व सखोल अभ्यास केल्यानंतर नाट्यसंगीताचे आदर्श सादरीकरण करता येऊ शकेल. अशारीतीने दोन्हींच्या सादरीकरणातील वेगळेपणामुळे नाट्यसंगीताच्या व्यापकतेची कल्पना येते.



अनुक्रमणिका

संगीत रंगभूमीने सर्वसामान्य लोकांना चांगल्या संगीताचा परिचय करून दिला व उच्च अभिरूची निर्माण केली यात शंका नाही. परंतु पुढे नाट्यसंगीताचे भवितव्य उज्ज्वल होण्याच्या दृष्टीने प्रामाणिक प्रयत्न करणे गरजेचे आहे असे वाटते.

**संदर्भसूची**


१) देवगंधर्व - सौ. शैला दातार - राजहंस प्रकाशन, पुणे (पान नंबर १९७)

२) संगीत रंगभूमीचे सुवर्णयुग - डॉ. रा. शं. वाळिंबे (पान नंबर ८५)

३) निवडक पुस्तके - संगीताने गाजलेली रंगभूमी - श्री. बाबूराव जोशी

४) वेध : संगीत नाटक व नाट्यसंगीत - डॉ. श्रीरंग संगोराम

५) स्वरप्रतिभा (दिवाळी २००५) - मराठी संगीत रंगभूमी विशेषांक

६) तरुण भारत - संगीत विशेषांक (१९८७) - संपादक - डॉ. अशोक रानडे

७) नाट्यसंगीत - ह. रा. महाजनी

८) मराठी नाट्यसंगीताची स्थित्यंतरे - डॉ. वासंती रानडे

९) स्वर ताल शब्द संगती - कीर्ती शिलेदार

१०) मराठी नाट्यसंगीत - बाळ सामंत





**सौ. धनश्री मकरंद खरवंडीकर**
'गीतायन' गुलमोहोर रोड, सावेडी,
अहमदनगर-४१४००३.
मोबा. : ९८२२३९१२४०

# बहुपेडी विन्दा

## डॉ. सु. म. तडकोडकर

मराठी साहित्यिकाच्या अभ्यासकाला अलिकडे खूपच उण्या प्रमाणात श्रेष्ठ स्तरावरची समीक्षा वाचायला मिळते, त्या संबंधीची कारणे अनेक देता येतील. उदाहरणार्थ, बा. सी. मर्ढेकर, शरद्चंद्र मुक्तिबोध, दि. के. बेडेकर यांच्यासारख्या स्वतंत्रपणे नव्या सिद्धांताची मांडणी करणाऱ्यांचे युग संपले असेल. त्याचबरोबर श्री. के. क्षीरसगार, रा. श्री. जोग, गं. ब. ग्रामोपाध्ये, वा. ल. कुलकर्णी, पु. शि. रेगे, गंगाधर गाडगीळ, रा. भा. पाटणकर यांची उणीव जाणवू लागली असेल किंवा प्रा. रां. ग. जाधव, डॉ. विजया राजाध्यक्ष, डॉ. सरोजिनी वैद्य, डॉ. सु. रा. चुनेकर, प्रा. म. सु. पाटील, प्रा. गंगाधर पाटील, माधव आचवल, द. ग. गोडसे, डॉ. मिलिंद मालशे यांच्यासारख्यांच्या तोलामोलाचे स्वतंत्रपणे अभ्यास करणाऱ्यांचे लेखन मराठी साहित्यिकाच्या अभ्यासकाला सहजपणे उपलब्ध होत नसेल किंवा असेही असेल की गवगवा करून वा आरडाओरड करून साहित्य समीक्षेला स्वतःच्या आकलनानुसार बटीक बनविण्याच्या प्रयत्नात आत्मनिष्ठेपेक्षा आत्मनिष्ठ साहित्य-समीक्षा करणाऱ्यांकडून मराठी साहित्यिकाच्या अभ्यासकाचे लक्ष स्वतःपाशी ओढून घेण्याचे प्रयत्न यशस्वी होत असतील. परंतु ज्या व्यक्तीत प्रज्ञेचा आणि प्रतिभेचा संगम झालेला असतो, त्या डॉ. विजया राजाध्यक्ष यांच्यासारख्या व्यक्तीने केलेले, 'बहुपेडी विन्दा' सारखे परिशीलनात्मक लेखन वाचनात येते तेव्हा मराठी साहित्यिकाच्या अभ्यासकाला बऱ्याच प्रमाणात दिलासा लाभतो.

गंभीर प्रकृतीच्या साहित्य समीक्षेच्या अभ्यासकाला डॉ. राजाध्यक्ष व प्रा.गोविंद विनायक उपाख्य विन्दा करंदीकर ही दोन नावे सुपरिचित आहेत. विन्दा करंदीकर हे गो. वि. करंदीकर या नावानेही सुपरिचित आहेत. मराठी कथा-साहित्यात तसेच साहित्य समीक्षेत स्वतःची आगळीवेगळी नाममुद्रा उमटविण्यात डॉ. राजाध्यक्ष यांना यश लाभले आहे. एक काळ असा होता की मंगेश पाडगावकर, वसंत बापट व विन्दा करंदीकर यांची मराठी कविता लेखनात स्वयंसिद्ध मिरासदारी होती. स्वतःच्या प्रज्ञेच्या तसेच प्रतिभेच्या सहाय्याने मराठी कविता, समीक्षा, लघुनिबंध या वाङ्मयप्रकारास समृद्ध करण्यात विन्दा करंदीकर यांनी यथोचित योगदान केले आहे. अशा जाणकारांच्या संवादांतून 'बहुपेडी विन्दा' हा द्विखंडात्मक ग्रंथ साकार होतो, तेव्हा मराठी साहित्यिकाच्या अभ्यासकाला मनःपूर्वक समाधान होऊ शकते, याविषयीची शंका असण्याचे कारण नाही.

बहुपेडी विन्दा खंड १ या, प्रकाशित झालेल्या ग्रंथात करंदीकरांची डॉ. राजाध्यक्ष यांनी घेतलेली प्रदीर्घ मुलाखत आहेच. त्याच्याशिवाय करंदीकरांनी जे आजवर समीक्षा लेखन केले त्याविषयीची साक्षेपाने केलेली नोंद आहे.

या ग्रंथाच्या प्रथम खंडाचे आगळेवेगळे वैशिष्ट्य असे की डॉक्टरेट ऑफ लिटरेचरसाठी सादर करावा, अशी तीत प्रबंधसादृश मांडणी आहे. अक्षर वाङ्मयाचा नव्याने शोध घेण्याचा हा प्रयत्न डॉ. राजाध्यक्ष यांनी प्रथमच केला आहे, असे म्हणता येणार नाही. १९४० नंतरच्या आधुनिक मराठी साहित्याची नव्याने मांडणी करणारे थोर कवी (व समीक्षक) बाळ सीताराम मर्ढेकर यांच्या कवितेच्या संदर्भात 'मर्ढेकरांची कविता : स्वरूप आणि संदर्भ' अशी अभ्यासाची कक्षा निश्चित करून डॉ. राजाध्यक्ष यांनी पीएच.डी. पदवीसाठीचे संशोधन केले होते व त्यानंतर मुंबईच्या मौज प्रकाशनाने त्या प्रबंधावर आधारलेला द्विखंडात्मक ग्रंथदेखील प्रकाशित केला होता. 'बहुपेडी विन्दा' हा ग्रंथदेखील मौज प्रकाशनानेच प्रकाशित केला आहे. मौज प्रकाशनाचा लौकिक ध्यानात घेता या ग्रंथातील बौद्धिक दृष्टिकोनाची मांडणी अत्यंत घट्ट विणीची असणारच, अशी अपेक्षा बाळगायला हरकत नाही. ती समाधानकारकपणे पूर्णदेखील होते. या ग्रंथात प्रामुख्याने दोन विभाग

कल्पिलेले आहेत. पहिला विभाग विन्दांची डॉ. राजाध्यक्ष यांनी घेतलेल्या मुलाखतीचा आहे तर दुसऱ्या विभागात करंदीकरांच्या समीक्षाविषयक जाणिवांचा शोध घेऊन त्याविषयीचे आकलन मांडले आहे. डॉ. राजाध्यक्ष यांनी आजचे समीक्षक या सदरासाठी ही मुलाखत घेतली ती नंतर (ललित, जानेवारी १९८३ ते जून १९८३) प्रसिद्धही झाली. या बहुपेडी विन्दा या ग्रंथातही ती एकंदर अठ्ठ्याऐंशी पृष्ठांत उपलब्ध होते.

आय. ए. रिचर्डस्‌ने भाषेचा उपयोग या विषयी स्वतःचे मत मांडताना असे म्हटले आहे की भाषेचा उपयोग Emotive use of language अर्थात भावात्मक आवाहन करण्यासाठी असतो, तर डी. जी. जेम्सने कल्पनात्मक आवाहन Imaginative use of language करण्यासाठी भाषेचा उपयोग होतो, असे नोंदविले आहे. विन्दांसारख्या विलक्षण जागरूक तरीही संवेदनशील व्यक्तीची मुलाखत घेण्यासाठी भाषेला फिरकत देणाऱ्या, भावात्मकता जपणाऱ्या जात्याच कल्पक, प्रतिभावान व प्रज्ञावान व्यक्तीची आवश्यकता असते. अन्यथा अशी मुलाखत अत्यंत थातूरमातूर स्वरूपाची होण्याचा धोका असतो. भाषेचा उपयोग भावात्मक तसेच कल्पनात्मक असे दुपेडी आवाहन करण्यासाठी करता येईल तरच मुलाखत घेतल्याचे समाधान लाभते. अशा मुलाखती याही पूर्वी घेतल्या होत्या. उदाहरणार्थ करंदीकरांची डॉ. राजाध्यक्ष यांनी जी घेतली. त्याहीपेक्षा वा. ल. कुळकर्णी यांची त्यांनी घेतलेली मुलाखत (ललित, एप्रिल १९७९, पृष्ठांक २२-४९) तर, माझ्या मते, बऱ्याच वरच्या स्तरावरची आहे. परिचितांची, त्यातही मान्यवर परिचितांची मुलाखत घ्यायची असेल तर ती किती वस्तुनिष्ठपणे अन्‌डोळसपणे घेता येते, याविषयीचा वस्तुपाठ त्यांनी घालून दिला आहे. याही मुलाखतीच्या निमित्ताने डॉ. राजाध्यक्ष यांनी करंदीकरांत वसत असलेल्या एक जागृत, संवेदनशील परंतु बौद्धिकता जपणाऱ्या मानवाचा परिचय करून दिला आहे.

१९४९ त पुणे येथे मराठी साहित्य संमेलनात आचार्य भागवतांच्या साक्षीने करंदीकरांनी स्वतःचे पहिले काव्यवाचन केले होते. स्त्री-पुरुष यांच्या समागमाविषयीची रक्तसमाधी ही कविता आचार्यांच्या आज्ञेमुळे वाचावी लागली होती. त्यावेळचा अनुभव सांगताना करंदीकरांना स्वतःला कसा घाम फुटला याविषयीची नोंद येते तर बाळ सीताराम मर्ढेकरांना मग्रुरीमुळे आपण स्वतःच्या कवितासंग्रहाची प्रत दिली नाही या संदर्भातलीही एक आठवण येते. या मुलाखतीत विपुल स्मृती आहेत. एखाद्या कवीला त्याची स्मृतिमंजुषा खुली करायला लावणे ही काही सोपी बाब नव्हे. ती डॉ. राजाध्यक्ष यांनी यशस्वीपणे करून दाखविली आहे.

या मुलाखतीच्या निमित्ताने स्वेदगंगा (१९४९, १९५८, १९६९, १९९४), मृद्‌गंध (१९५४, १९६२, १९६९, १९७५, १९९४), धृपद (१९५९, १९७८, १९९६, २००४), जातक (१९६८, १९८३), विरूपिका (१९८१, २००३) या त्यांच्या प्रौढ कवितासंग्रहांच्या संदर्भात सृजनात्मकतेविषयीच्या जाणकार नोंदी येतात तर स्पर्शाची पालवी १९५८, १९९९), आकाशाचा अर्थ (१९६५, २००४) या त्यांच्या लघुनिबंधाविषयीचे आकलन होते. इथेच डॉ. राजाध्यक्ष यांनीच पुढे करंदीकरांचे समग्र लघुनिबंध (१९९६) संपादित केले होते, याविषयीचेही वाचकाला स्मरण होते. करंदीकरांनी मराठीत तसेच इंग्रजीत साहित्यसमीक्षात्मक लेखन केले आहे. परंपरा आणि नवता (१९८०), उद्‌गार (१९९६), लिटरचर ॲज अ व्हायटल आर्ट (१९९१), अ क्रिटिक ऑफ लिटररी व्हॅल्यूज (१९९७) हे काही महत्त्वाचे लेख मौलिक म्हणून महत्त्वाचे आहेत. त्यांनी काही संकल्पनात्मक स्वरूपाचेही लेखन केले आहे. तसे काही टिरिनी ऑफ ब्यूटी हा लेख अद्यापि कागदावर उतरलेला नाही. एकंदरीतपणे इंग्रजी समीक्षकांच्या दृष्टीतून या लेखनाचे मूल्य नेमके कोणते आहे, हे संबंधित विचारवंत सांगू शकतील. मराठीच्या पार्श्वभूमीवर वावरणाऱ्यांना या इंग्रजी लेखनाच्या संदर्भात विशेष काही सांगता येईल असे नाही. तथापि डॉ. राजाध्यक्ष यांनी तसा प्रयत्न करून पाहिला आहे. या लेखनाव्यतिरिक्त करंदीकरांनी अनुवाद, अर्वाचिनीकरण (संत ज्ञानेश्वरांचा अमृतानुभव), बालकाव्य असे विपुल लेखन केले. या





अनुक्रमणिका

मुलाखतीच्या निमित्ताने त्यांच्या संपूर्ण लेखनाविषयीचा तपशीलवारपणे आलेख साकार होत जातो. त्यांचे समीक्षालेखनदेखील काव्यालाच प्राधान्य देते. आपण कवितेला अधिक वेळ देतो ही वस्तुस्थिती असली तरी स्वतःची कवितेइतकीच लघुनिबंधातही भावनिक गुंतवणूक आहे, असेही ते सांगून टाकतात. मराठी समीक्षा लेखन हे सृजनाशी संबंधित आहे तर इंग्रजीतील लेखन सैद्धांतिक, तात्त्विक स्वरूपांचे आहे, अशी फोडही करून दाखवतात. ॲरिस्टॉटलचे काव्यशास्त्र, फाउस्ट तसेच राजा लीअर हे अनुवाद माधवराव पटवर्धन उपाख्य माधव जुलियन यांच्याकडून प्रेरणा मिळाल्यामुळे असे सांगून ऋण मान्य करतात.

काव्यगत विचार निखळ बौद्धिक स्तरावर पूर्णत्वाने कधीच जाणता येत नाही असा निर्णय करंदीकर देतात. चांगला वाचक एकांतात कविता वाचतो. कवितेतल्या अनुभवाप्रमाणेच कवितेची भाषादेखील कल्पनेच्या पातळीवर सजीव होऊन बोलत असते. पक्क्या बंदिशीची प्रत्येक कविता वाचकाला जणू तू मला असे वाच असेच सांगत असते. सर्वसामान्य वाचक तशी वाचू शकत नाही. या वस्तुस्थितीकडे करंदीकर संबंधितांचे लक्ष वेधतात.

मर्ढेकरांवरचे तिन्ही लेख आपण केवळ ऋणभावनेने लिहिले; परंतु नव्या कवितेवर लिहिणे आपले कर्तव्य आहे, असे वाटत नसल्याचे ते असे दिलखुलासपणे मान्य करतात. निव्वळ कौतुकापोटी लिहवणारी उमदी अन् उदार रसिकवृत्ती स्वतःच्या स्वभावात नाही, असेही ते स्पष्टपणे सांगतात.

मुलाखतीच्या भागानंतर डॉ. राजाध्यक्ष यांनी करंदीकरांच्या समीक्षात्मक लेखनाचे परिशीलन करण्याचा प्रयत्न केला आहे. त्या निमित्ताने त्यांनी नवीन दिशा देणाऱ्यांच्या कार्याची नोंद घेत असतानाच मराठी साहित्याच्या क्षेत्रातील विविध आंदोलनाचा परामर्श घेतला आहे. करंदीकरांच्या मराठीतील व इंग्रजीतील समीक्षात्मक लेखनाच्या रूपरेषेची एकसमयावच्छेदेकरून मांडणी करीत असतानाच आवश्यक असलेल्या अभ्याससाधनांचा परिचय करून दिला आहे. त्यांच्या आधारे करंदीकरांच्या या अशा प्रकाराच्या लेखनातील प्रयोजनाचे, समस्यांचे आकलनही करून घेण्याचा प्रयत्न केला आहे. या निमित्ताने मर्ढेकरांच्या समीक्षापर तात्त्विक बैठकीचे तसेच रा. भा. पाटणकर यांनी सौंदर्यमीमांसेत केलेल्या विवेचनाचे भानही ठेवले आहे. या पार्श्वभूमीवर करंदीकरांची भूमिका तपासून पाहण्याचा प्रयत्न केला गेला आहे.

करंदीकर एकंदर कलांच्या वर्गीकरणाचे स्वरूप सांगतात. काही कलांच्या तुलनेत, साहित्य वेगळे अस्तित्व बाळगणारा असा कलाप्रकार आहे कारण साहित्य ही वास्तवाची प्रतिकृती आहे, असे ते मानतात. डॉ. राजाध्यक्ष यांनी त्याच अनुषंगाने असे मत नोंदविले आहे की, करंदीकर रूढार्थाने जीवनवादी अथवा कलावादी नव्हेत.

या परीक्षणात या बहुपेडी ग्रंथाचे मूल्यमापन करण्याचे उद्दिष्ट नसल्याने केवळ मर्म सांगण्याचा प्रयत्न झाला आहे.

❊❊❊

आधुनिक मराठी समीक्षेच्या क्षेत्राला संशोधनपरतेचे वृत्तिगांभीर्य प्रदान करणाऱ्या डॉ. विजयाबाई राजाध्यक्षांनी लिहिलेले ३२२ पृष्ठांचा 'बहुपेडी विंदा-खंड एक' हे पुस्तक प्रकाशित केल्यानंतर मुंबईच्या मौज प्रकाशनाने मागोमाग 'बहुपेडी विंदा-खंड दोन' हे ४७६ पृष्ठांचे पुस्तक अभ्यासकांच्या हातात दिले आहे. त्यामुळे व्यासंगाचे प्रतिबिंब उमटविणाऱ्या एका ग्रंथाची निर्मिती झाली आहे, असे म्हणता येते. या पूर्वी आधुनिक काळातील साहित्यिकाचे परिशीलन इतक्या मोठ्या स्वरूपात प्रकाशित करण्याचे इतके मोठे धाडस कोणी केले असल्याचे मला तरी ज्ञात नाही. 'स्वेदगंगा', 'मृद्‌गंध', 'धृपद', 'जातक', 'विरूपिका' हे कवितासंग्रह, 'स्पर्शाची पालवी' व 'आकाशाचा अर्थ' हे लघुनिबंध संग्रह लिहिणाऱ्या विंदा (गोविंद विनायक) करंदीकरांना इ. स. २००३ साठीचा ज्ञानपीठ पुरस्कार जानेवारी २००६मध्ये जाहीर झाला. त्यानंतर हा दुजा खंड प्रकाशित झाला. या ग्रंथास 'विंदा : व्यक्ती आणि वाङ्मय' असे शीर्षक दिले असते तर ते 'बहुपेडी विंदा' म्हटल्याने जितका ठाशीवपणा आला आहे तितका

आला नसता.

'बहुपेडी विंदा-खंड एक' या ग्रंथात प्रामुख्याने दोन विभाग कल्पिलेले आहेत. या दोन विभागांना जोडून फलश्रुती आणि सहा परिशिष्टे उपलब्ध होतात; परंतु त्यातील 'माझा दृष्टिकोन' हे विन्दांचे स्वगत म्हणजे या ग्रंथावरले 'चेरीचे फळ'च होय. प्रथम विभागात अठ्ठ्याऐंशी पृष्ठांतली विंदांची मुलाखत दिली आहे तर दुज्या विभागात करंदीकरांच्या समीक्षाविषयक जाणिवांचा शोध घेऊन त्याविषयीचे आकलन मांडले आहे. 'बहुपेडी विंदा-खंड दोन' या पुस्तकात प्रामुख्याने कविता आणि लघुनिबंध अशा दोन विभागात सर्व संशोधनपर लेखन समावले आहे. कवी विंदांच्या कवितेच्या संदर्भात 'उपोद्धात', 'परिप्रेक्ष्य आणि पार्श्वभूमी' 'आशयसूत्रे', 'आकृतिबंध', 'बालकविता', 'काव्याची अन्य वाकूवळणे', 'अष्टदर्शने', 'रूपविशेष' आणि 'उपसंहार' असे नऊ पोटविभाग आढळतात.

लघुनिबंधाशी संबंधित विभागात 'उपोद्धात', 'लघुनिबंध' या साहित्यप्रकाराचे स्वरूप', 'करंदीकरांचा लघुनिबंध' आणि 'उपसंहार' असे चार पोटविभाग समाविष्ट झाले आहेत. 'मनोगता'त डॉ. राजाध्यक्षांनी मराठीतील ज्या विद्वानांचा व साहित्यिकांचा उल्लेख केला आहे त्या सर्वांचा अभ्यासकाला पुन्हा एकदा नव्याने परिचय होतो व त्यांच्यासमोर त्याचे चित्त नम्र होते. या ग्रंथात विंदांच्या मुद्रांचे प्रतिबिंब दर्शविणारी काही रंगीत छायाचित्रे दिली आहेत. तो तर या ग्रंथातील महत्त्वाचा ठेवा होय.

डॉ. राजाध्यक्ष यांनी 'उपोद्घाता'त १९४७ नंतरच्या काळातील मराठी कवितेच्या विकसनशीलतेचा आलेख मांडला आहे. तसेच महाराष्ट्रातील सामाजिक व राजकीय आंदोलनाचा परामर्षही घेतला आहे. या पार्श्वभूमीवर डॉ. राजाध्यक्ष 'उपोद्घाता'त म्हणतात की 'मर्ढेकरांनी प्रवर्तित केलेल्या नवकवितेच्या कालखंडातील कविसमुहात विंदा करंदीकर हे उच्च स्थानावर असलेले नाव आहे. त्यांच्या कवितेचे विशेष निकटचे नाते केशवसुत, माधव जुलियन व बा. सी. मर्ढेकर यांच्या कवितेशी आहे ते करंदीकरांची १९४९ ते १९८१ या कालखंडातील कविता वाचताना लक्षात येते.'' त्यांच्या कवितेची जेरार्ड मॅनली हॉपकिन्स (१८४४-१८८९), टी. एस. इलियट (१८८८-१९६५) यांच्यासारख्यांच्या पाश्चात्य कवींच्या व सिग्मण्ड फ्रॉयड व कार्ल मार्क्स या विचारवंतांच्या संस्कारातून आणि प्रभावातून जडणघडण झाली होती. असे असूनही विंदांनी स्वतःचे वैचारिक स्वातंत्र्य मर्यादित होणार नाही याची शक्य तितकी काळजी घेतली होती या वस्तुस्थितीकडे लेखिका अभ्यासकाचे लक्ष वेधू पाहते.

करंदीकरांनी स्वतःच्या कवितेचे केलेले 'सामाजिक जाणिवेचे क्षेत्र', 'लैंगिक जाणिवेचे क्षेत्र', 'व्यक्तिदर्शनाचे क्षेत्र' व 'चिंतनात्मक जाणिवेचे क्षेत्र' अशी वर्गीकरणे जरी उपयुक्त नसली तरी आरंभी ती सोयीसाठी स्वीकारली जाऊ शकतील असे डॉ. राजाध्यक्ष यांनी नोंदविले आहे. मात्र स्वतः विंदांच्या कवितेचे आकलन करून घेण्यासाठी सामाजिक जाणिवेची, प्रीतीची, निसर्गाची, कवितेची, आध्यात्मिक जाणिवेची, व्यक्तिचित्रणात्मक काव्यरचना अशी रूढ वर्गीकरणे स्वीकारली आहेत. सोबत लेखिकेने विंदांच्या कवितेतील आकृतिबंधांविषयी काही अभ्यासपूर्ण निरीक्षणे मांडली आहेत. त्यामुळे मुक्तसुनीत, तालचित्रे, गझल, आततायी अभंग, सूक्त, विरूपिका यांचा नीटपणे परिचय करून घेण्याची संधी मिळते. 'बालकविता' हे या विभागातील अल्पसेच पण लक्षणीय प्रकरण होय. या निमित्ताने विंदांनी बालकविता या प्रकाराविषयीचे केलेले विवेचन ध्यानात घेण्याचा प्रयत्न झाला आहे. 'प्रत्येक बालकविता आपली लय घेऊन येते' असे विंदा म्हणतात. विरेचनाचा अनुभव बालकांनाही येतो असे विंदांनी म्हटले आहे अशी नोंद येते. बालसाहित्याची निर्मिती करणाऱ्यांनी ही नोंद ध्यानात ठेवण्यासारखी आहे. या संदर्भात करंदीकर म्हणतात, ''अद्‌भुताच्या जगातून काल्पनिक विहार करताना मुले त्या जगाला सन्मुख होतात. ते जग अनुभवताना त्यांच्या मनात भय निर्माण होते आणि भय या भावनेचे विरेचन होऊन एक प्रकारचा हलकेपणा, मुक्तपणाही येतो. हा विरेचनाचा



अनुक्रमणिका

अनुभव घेऊन मुले अधिक प्रगल्भ होतात. त्यांना जगातील कुरूपाला, विद्रूपतेला सामोरे जाण्याचे बळ मिळते. हा या प्रकारच्या बालकवितांच्या वाचनातून होणारा लाभ आहे.''

मालिका-कवितेचा संदर्भ उलगडून दाखविला आहे. त्या निमित्ताने 'सर्कसवाला', 'परी ग परी', 'यात्रावळ' मध्ये फॅण्टसीचे चित्रण कसे केले आहे याकडे अभ्यासकाचे लक्ष वेधले आहे. करंदीकर हे कोकणातले होते. त्यामुळे त्यांच्या बालकवितेतही त्या प्रदेशातील दारिद्र्य, लाचारी दाखविली गेली आहेच तसेच तेथील भाषेचेही रोपण केले आहे. या कविता मुलांचे रंजन करतातच तसेच त्यांच्या मनावर चांगले संस्कार करतात असे लेखिका म्हणते. मात्र त्या संस्कारांत थेट बोध नसून नकळत होणारा संस्कार होय अशीही नोंद करते.

प्रा. करंदीकरांनी 'राजा लीअर' व 'फाउस्ट'चा अनुवाद वा 'अमृतानुभवा'चे अर्वाचीनीकरण करीत असतानाही तसेच 'अष्टदर्शने'चे लेखन करीत असताना स्वतःतील कवी जागृत ठेवला होता असे 'काव्यांची अन्य वाक्‌वळणे'त डॉ. राजाध्यक्षांनी साधार दाखवून दिले आहे. लेखिकेने विंदांच्या अप्रकाशित व असंग्रहित कवितांच्या सोबत अनुवादित कवितांचाही परिचय करून दिला आहे. या विभागाचे आगळे-वेगळे वैशिष्ट्य म्हणजे 'रूपविशेष'मध्ये विंदांच्या कवितेची भाषा, तीतील लय, प्रतिमा आणि दुर्बोधता उमजून घेण्यासाठी दाखवलेली दिशा होय.

डॉ. राजाध्यक्ष यांनी विंदांचे लघुनिबंध उमजून घेण्यासाठी काही गृहीतके नोंदविताना लघुनिबंध या साहित्यप्रकाराचे स्वरूप तसेच लघुनिबंधाची वैशिष्ट्ये आणि मर्यादा उलगडून दाखविल्या आहेत. त्यामुळे करंदीकरांत दडलेला कवी, निबंधकार आणि समीक्षक यांचे परस्परसंबंध स्पष्ट होण्यास सहाय्य होते. ज्या प्रमाणे त्यांच्यावर पाश्चात्य कवींचा प्रभाव पडला होता तद्वत् चार्लस लॅम्बने लघुनिबंधकार म्हणून भारून टाकले अशी नोंद येते. डॉ. राजाध्यक्ष यांनी प्रतिपादलेला करंदीकरांच्या लघुनिबंध लेखनातील 'फॅण्टसी' हा विषय उल्लेखनीय वाटतो. डॉ. राजाध्यक्ष यांनी करंदीकरांच्या लघुनिबंधात दडलेल्या कवित्वाचा, समीक्षेचा तसेच त्यांच्या मर्यादांचा घेतलेला शोध अभ्यासकाला खचितच नवे काही देणे देऊन जाईल.

करंदीकरांचा निबंध कथा या वाङ्मयप्रकारापासून विलग राहतो याकडे लेखिकेने लक्ष वेधले आहे. त्याविषयीचे कारण सांगताना ती म्हणते, ''त्यांनी जे सत्य सांगायचे असते किंवा जो विचार मांडायचा असतो, तो असतो तो अनेक भूतकालीन संदर्भ घेऊन आलेला आणि क्वचित भविष्यकालालाही सन्मुख असणारा, असा वर्तमानकालीन विचार असतो. त्यात कथेला आवश्यक असलेला कालबदल सहसा घडत नाही.'' तथापि डॉ. राजाध्यक्ष यांनी त्यांचे 'स्नेही' व 'डोळी' हे लघुनिबंध असूनही त्यांना डॉ. मिलिंद मालशे यांनी कथा असे संबोधले होते, त्याचीही आठवण करून दिली आहे. या लघुनिबंधाचे गंगाधर गाडगीळ यांच्या 'कडू आणि गोड' आणि 'कबुतरे' या कथांशी साधर्म्य जाणवते असेही म्हटले आहे.

अभ्यासकाला आवश्यक वाटू शकणारा चरित्रपट, साहित्यसंपदा, संदर्भसूची वगैरे या ग्रंथात आढळते. मात्र दोन्ही खंडांत निर्देश-सूची नसल्याने काही प्रमाणात अडचणी येऊ शकतात. गंभीरपणे अभ्यास करू पाहणाऱ्यांच्या सोबत विंदांच्या लेखनावर मनमुराद प्रीती करणाऱ्यांनाही हा ग्रंथ म्हणजे 'सबकुछ विंदा' होय, असे वाटू शकेल.

❖❖❖

**डॉ. सु. म. तडकोडकर**
१/बी, एस ५, दुसरा माळा, कामत प्लाझा,
सान्ता इनेज, पणजी, तिसवाडी, गोवा-४०३००१
दूरभाष : ०८३२/२४२३५७७

●

**बहुपेडी विंदा - खंड एक,**
डॉ. विजया राजाध्यक्ष,
मौज प्रकाशन गृह, मुंबई,
पृष्ठे : ३२२, मूल्य : रु. २५०/-

**बहुपेडी विंदा - खंड दोन,**
डॉ. विजया राजाध्यक्ष,
मौज प्रकाशन गृह, मुंबई,
पृष्ठे : ४७६, मूल्य : रु. ३५०/-

# श्रीकृष्ण राऊत ह्यांची गझल

डॉ. अविनाश सांगोलेकर, पुणे.

मराठीतील ज्येष्ठ व श्रेष्ठ गझलकार कै. सुरेश भट (जन्म : इ.स. १९३२, मृत्यू : इ.स. २००३) ह्यांच्यानंतरच्या पिढीतील एक महत्त्वाचे गझलकार श्रीकृष्ण राऊत (जन्म : इ.स. १९५५) हे होत. ते एम्.कॉम्., एम्.फिल्. असून विदर्भातील अकोला येथील श्री शिवाजी कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालयात 'वाणिज्य' विषयाचे अधिव्याख्याता म्हणून कार्यरत आहेत. मराठी भाषा व साहित्य ह्या दोहोंच्या आवडीमधून त्यांनी एम्. ए. (मराठी) केले असून ते नुकतेच पीएच्.डी. ही झाले आहेत. राऊतांनी कविता, कथा, एकांकिका, समीक्षण आदी स्वरूपातील विपुल लेखन केलेले असून ह्या लेखनाला 'कविता-रती', 'अनुष्टुभ्', 'साधना', 'अक्षर', 'हंस', 'महाराष्ट्र टाइम्स', 'मौज, 'अस्मितादर्श,' 'प्रतिष्ठान', 'युगवाणी' आदी प्रतिष्ठित नियतकालिकांमधून प्रसिद्धी मिळालेली आहे. शिवाय चित्रपट, दूरदर्शन, आकाशवाणी, ध्वनीफिती आदी प्रसार माध्यमांमधूनही प्रसिद्धी मिळालेली आहे. विपुल आणि विविध लेखनाबद्दल राऊतांना आजपर्यंत अनेक मान-सन्मान प्राप्त झालेले आहेत.

राऊत हे प्रामुख्याने कवी म्हणून, गीतकार म्हणून, विशेषतः गझलकार म्हणून मराठी रसिकांना सुपरिचित आहेत 'गुलाल' (१९८९), 'एकविसाव्या शतकाच्या उंबरठ्यावर जन्म घेणाऱ्या तान्ह्या मुला' (२००१), 'गुलाल आणि इतर गझला' (२००३), 'चार ओळी तुझ्यासाठी' (२००३) हे चार काव्यसंग्रह त्यांच्या नावावर जमा असून त्यातील पहिला व तिसरा काव्यसंग्रह संपूर्णपणे गझलांचा आहे. 'डुंडा ओळा पिपल साई' हा त्यांचा कोरकू आदिवासांच्या जीवनानुभवाला अभिव्यक्ती देणारा कवितासंग्रह प्रकाशनाच्या वाटेवर आहे. अशा राऊतांची गझलकार म्हणून प्रथम ओळख महाराष्ट्राला झाली ती १९८१ मध्ये प्रदीप गुजर संपादित 'कविता' ह्या गाजलेल्या प्रातिनिधिक काव्यसंग्रहामधून. ह्या संग्रहात राऊतांच्या चार गझला समाविष्ट आहेत.[१]. ही ओळख अधिक ठसठशीत करण्योच काम 'काफला' (१९९०)[२], 'गझलधारा' (१९९४)[३], 'कारवा' (२०००)[४] व 'विदर्भाची मराठी गजल' (२००४)[५] ह्या चार प्रातिनिधिक मराठी गझलसंग्रहांमधील त्यांच्या गझलांनी केले. दरम्यानच्या मधल्या काळात एप्रिल १९८९ मध्ये महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या नवलेखक अनुदान योजनेमधून श्रीरामपूर (जि. अहमदनगर) येथील शब्दालय प्रकाशनाने राऊतांचा 'गुलाल' हा गझलसंग्रह प्रकाशित केला. संग्रहामध्ये ५० गझला आहेत. नंतर स्वतः राऊतांनी फेब्रुवारी २००३ मध्ये 'गुलाल आणि इतर गझला' हा आपला दुसरा गझलसंग्रह प्रकाशित केला.[६] ह्या संग्रहामध्ये आधीच्या 'गुलाल' ह्या संग्रहामधील ५० गझला तर आहेतच, शिवाय नव्या अशा १९ गझलाही आहेत. तसेच संग्रहाच्या मलपृष्ठावर 'एकविसाव्या शतकाच्या उंबरठ्यावर जन्म घेणाऱ्या तान्ह्या मुला' ह्या काव्यसंग्रहातील 'भाई' ह्या शीर्षकाची गझलही उद्धृत करण्यात आलेली आहे. अशा प्रकारे नव्या-जुन्या अशा सर्व मिळून राऊतांच्या संग्रहबद्ध गझलांची संख्या ७० भरते. श्रीकृष्ण राऊत ह्यांची गझल जाणून घ्यायची ती ह्या संग्रहबद्ध ७० गझलांवरूनच.

राऊतांची गझल ही गझलवृत्त व गझलवृत्ती ह्या दोहोंच्या बाबतीतले समाधान खूप देऊन जाणारी आहे. ती पुष्कळशी निर्दोष आहे. तिच्यात विपुलता व विविधता लक्षणीय आहे. वृत्तयोजनेच्या बाबतीत तपशील द्यावयाचा झाला, तर ७० गझलांपैकी ६६ गझला ह्या अक्षरगणवृत्तांमधील आहेत आणि उर्वरित ४ गझला ह्या मात्रावृत्तांमधील आहेत. 'आनंदकंद' ह्या लोकप्रिय अक्षरगणवृत्तामध्ये २९ गझला आहेत, 'वियद्‌गंगा' व 'स्रग्विणी' ह्या अक्षरगणवृत्तांमध्ये प्रत्येकी ७-७ गझला आहेत, 'देवप्रिया' ह्या



अनुक्रमणिका

अक्षरगणवृत्तांमध्ये ४, 'भुजंगप्रयात' व 'देवराज' ह्या अक्षरगणवृत्तांमध्ये प्रत्येकी ३-३, तर 'सुकामिनी', ह्या अक्षरगणवृत्तामध्ये २ गझला आहेत. बाकीच्या ११ अक्षरगणवृत्तांमध्ये प्रत्येकी एकेक गझल आहे. ही सर्व वृत्तयोजना निर्दोष, तंत्रशुद्ध, सफाईदार, सहजोस्फूर्त जाणवते. क्वचित काही ठिकाणी एका गुरू अक्षराऐवजी दोन लघु अक्षरे वापरण्याची सवलत घेतलेली आढळते. तसेच अगदी थोड्या ठिकाणी वृत्तपूर्तीसाठी 'मधुर', 'चतुर', 'झिंगुनी', 'बुद्धीबळास', 'नाजूक' असे अशुद्ध शब्द वापरलेले आढळतात. 'सोमराजी', 'आनंद', 'मनोहरा' ही अत्यंत छोटी व दुर्मिळ अक्षरगणवृत्ते राऊतांनी सफाईदारपणे हाताळली आहेत. नमुन्यादाखल 'सोमराजी' ह्या अक्षरगणवृत्तामधील 'पुजारी' (पृ. ५३) ही गझल पाहण्याजोगी आहे. ह्या गझलेतील पहिल्या तीन द्विपदी अशा आहेत :

कशी वेळ आली
क्षमा क्रूर झाली !
हसे आज कुंकू
गमावून लाली.
करा बंद वर्षा;
पिके तर जळाली.

राऊतांची गझल ही आत्मचिंतनपर, सामाजिक व प्रेमविषयक अशा तीन प्रकारचा आशय मोठ्या प्रमाणात व्यक्त करणारी आहे. ह्या गझलेच्या केंद्रस्थानी प्रामुख्याने 'मी' आढळतो. हा मी बऱ्याच प्रमाणात जगाकडून दुखावला गेलेला, तरीही रडत-कुढत न राहणारा, जिद्दीने प्रतिकूल परिस्थितीशी सतत झुंज देत जगणारा आहे.[७] नमुन्यादाखल काही द्विपदी पाहू :

१. ''माझी भकास शिल्पे शोधीत काल होता;
तो देखण्या व्यथेचा ऐनेमहाल होता'' ('गुलाल', पृ. १२)
२. ''हासतो जरी सुरात मी;
घाव झाकतो उरात मी.'' ('सोबती', पृ. १५)
३. ''आत्मकेंद्री फार झाले खानदानी आरसे;
त्यात नाही स्पष्ट आता दुःख माझे फारसे.'' ('तेरवी', पृ. १९)
४. ''जीवना रे मला त्रास ह्याचाच की;
कोणताही तुझा त्रास नाही खरा...'' ('घास', पृ. २३)
५. ''निखाऱ्यातून दुःखाच्या सुखाने चालतो आता;
हवा ही बोलकी झाली हवेशी बोलतो आता.'' ('मदिरा', पृ. २८)
६. ''तुला सांग दुःखा कसा मित्र मानू?
हवे तेवढे तू न आघात केले.'' ('हात', पृ. ३३)
७. ''हुंदक्याचे फूल काढी अंतरंगी स्वस्तिके;
आज दिंडी आसवांची येत आहे लोचना.'' ('दिंडी', पृ. ३९)
८. ''उभी जिन्दगानी पहाडाप्रमाणे;
तिला लोटतो मी कवाडाप्रमाणे'' ('फूल' पृ. ७५)

राऊतांची गझल सामाजिक आशय व्यक्त करताना उपहास, उपरोध ह्या अस्त्रांचा मार्मिक उपयोग करते. ती नेमकेपणाने वर्मावर बोट ठेवते, नव्हे, घाव घालते. त्यातून जे सामाजिक वास्तव उघडे होते, ते मनाला क्लेशदायक असते. गझलकाराने जणू आपल्या मनातीलच चीड बोलून दाखवली आहे, असे रसिकाला वाटत राहते. ह्या सर्व दृष्टीने काही प्रातिनिधिक ठरतील, अशा द्विपदी पुढीलप्रमाणे :

१. ''दिसते जरी तुम्हाला ही फार छान वस्ती;
सेंटेड माणसांची भलतीच घाण वस्ती.'' ('वस्ती', पृ. २२)
२. ''टाळा हुशार पाणी बेटे सनातनी ते;
चवदार ह्या तळ्याला राखा असेच राखा.'' ('पहाट', पृ. ३४)
३. ''मांजरीने कुण्या शाप ह्यांना दिला ?
एकमेकास हे बोखरू लागले.'' ('वाढ', पृ. ३६)
४. ''हुंकार देत आहे काळोख भोवताली;
सांभाळ रे दिव्या तू रंगीत रोषणाई !'' ('अनुवाद', पृ. ३८)
५. ''जखमेस न्याय आता सांगा कसा मिळावा ?
सामील रक्त झाले निर्ढावल्या सुऱ्याला !'' ('सामील' पृ. ४०)
६. ''नावा किती बुडाल्या त्याचा हिशेब नाही;
पण दीपस्तंभ सारे सागर तरून गेले.'' ('लकवा', पृ.



अनुक्रमणिका

४६)

७. "फाटून नष्ट झाला मागे कधीच झेंडा
हा उंच भीकमाग्या नुसताच हात आहे.." ('झेंडा', पृ. ४९)

८. "घाऊक आजचा हा बाजारभाव ताजा
स्वस्तात रक्त मिळते भाकर महाग आहे !" ('डाग', पृ. ५०)

९. "खुनी देव झाले;
पुजारी मवाली !" ('पुजारी', पृ. ५३)

१०. "ज्यांना तहान त्यांना पाणी न पाजतो;
देवास घालतो पण अभिषेक भामटा." ('भामटा', पृ. ७२)

११. "मठाला स्थापण्यासाठी पुन्हा येतात मंबाजी;
खिशाच्या आत घालुनी विठू नेतात मंबाजी." ('मंबाजी', पृ. ७४)

राऊतांची गझल प्रेमविषयक आशय व्यक्त करताना प्रेमभावनेच्या विविध छटा समर्थपणे व सौंदर्यपूर्ण वृत्तीने रसिकांसमोर आणते. 'आषाढ' (पृ. १३), 'रासलीला' (पृ. ३०), 'निखारे' (पृ. ४३) व 'बिंब' (पृ. ५५) ह्या चार गझलांचा मात्र वेगळा विचार करावा लागेल. कारण ह्या चारही गझलांचे स्वरूप 'गझलेच्या आकृतिबंधातील नाट्यगीत' असे आहे. 'गझल' हा आत्मनिष्ठ काव्यप्रकार आहे. त्याद्वारे स्वतःच्या भावभावना, चिंतन व्यक्त व्हावे, अशी अपेक्षा असते. कवी जेव्हा परचित्तप्रवेश करून दुसऱ्याच्या भावभावना, चिंतन व्यक्त करतो; तेव्हा त्याच्या कवितेचे स्वरूप 'नाट्यगीत' असे बनते. राऊतांनी उपरोक्त चार तथाकथित गझलांमधून परचित्तप्रवेश करून प्रेयसीच्या भावभावना, चिंतन तिच्याच शब्दांमधून व्यक्त केलेले आहे. सुरेश भटांच्या 'रूपगंधा' (१९६१) ह्या काव्यसंग्रहामध्ये 'रूपगंधा' (पृ. १) ही एक गझल; 'रंग माझा वेगळा' (१९७४) ह्या काव्यसंग्रहातील 'माझी उदास गीते' (पृ. ३२), 'तरूण आहे रात्र अजुनी' (पृ. ६१) ह्या दोन गझला, 'एल्गार' (१९८३) ह्या काव्यसंग्रहातील 'एकटी' (पृ. २२), 'भल्या पहाटे निघून आले' (पृ. २८) व 'सुन्या सुन्या मैफलीत' (पृ. ८२) ह्या तीन गझला ह्याच कारणाने खऱ्या अर्थाने गझला न ठरता गझलेच्या आकृतिबंधातील नाट्यगीते ठरतात. मात्र एक कविता म्हणून, नाट्यगीत म्हणून भटांच्या व राऊतांच्याही ह्या तथाकथित गझला उत्कृष्ट आहेत, ह्यात दुमत असण्याचे काही कारण नाही. राऊतांच्या 'सावळी' (पृ. ८०) ह्या प्रेमविषयक गझलेबद्दल एक तक्रार अशी की, ह्या गझलेतील बऱ्याचशा द्विपदी ह्या नेहमीच्या भावकवितेप्रमाणे-भावगीताप्रमाणे सरळ, सपाट व उलगडत जाणाऱ्या अशा आहेत. अन्य प्रेमविषयक गझला व प्रेमविषयक द्विपदी मात्र गझलवृत्त व गझलवृत्ती ह्या दोहोंना पूर्ण न्याय देणाऱ्या आहेत. काही प्रभावी द्विपदी अशा :

१. "पुसून लोचने जिथे तुझा निरोप घेतला;
अजून ती मनात ह्या तुझी वरात राहिली." ('वरात', पृ. २५)

२. "गोऱ्या तुझ्या रूपाने भलती कमाल केली;

बघण्यास आरशाला दृष्टी बहाल केली.'' ('रक्त', पृ. ३२)

३. ''पापण्यांनी खोल केले वार तू;
सात माझे जन्म केले ठार तू.'' ('सत्कार', पृ. ३७)

४. ''लाजली पौर्णिमा, लोपला चंद्रमा, चांदण्यांनी तुझा चेहरा पाहिला;
सांगतो मी खरे, फार झाले बरे, फक्त त्यांनी तुझा चेहरा पाहिला.'' ('चेहरा', पृ. ४७)

५. ''वळणावरून तूही जाशील दूर राणी;
होईल फूल माझे निर्माल्य त्या ठिकाणी.'' ('राख', पृ. ५१)

६. ''कुंतलात गुंतता अखेर हीच जाण ये-
कापणार ना गळ्यास तोच केस चांगला.'' ('जाण', पृ. ७०)

७. ''तुझा हात साधा न हातात माझ्या;
मला भेटली तू घबाडाप्रमाणे.'' ('फूल', पृ. ७५)

८. ''माझियाऐवजी ओठ ज्या चुंबिती;
त्या बटांना गडे दूर सारू नको.'' ('डाव', पृ. ७७)

९. ''आज काळास हे काय झाले असे -
संपली रात्र माझी पळासारखी.'' ('पारदर्शी', पृ. ७८)

१०.''लाव छातीस तू कान देवा जरा;
ऐक माझ्या उरी सावळी सावळी.'' ('सावळी', पृ. ८०)

श्रीकृष्ण राऊतांची गझल प्रभावी पद्धीतने जीवनभाष्य करणारी आहे. ती जगण्याची उमेद वाढवणारी आहे. तिच्यामध्ये परिणामकारक उपदेशात्मकता आहे. ह्या सर्व संदर्भातील नमुने म्हणता येतील, अशा काही द्विपदी पुढीलप्रमाणे :

१.''चाणाक्ष ह्या हवेचा श्वासात धाक ठेवा;
चालेल जीव गेला, शाबूत नाक ठेवा.'' ('काटे', पृ. १७)

२.''माणूस तू कसा रे खातोस शेण वेड्या;
इतका नको पडू तू सांभाळ तोल काही.'' ('तोल', पृ. २४)

३.''नव्या या उंबऱ्यावरती जळे पाऊल लक्ष्मीचे;
कुणी हे लावले आहे इथे रॉकेल मापाला ?'' ('कोळसा', पृ. २६)

४.''पोथीत पेरती हे संदेश लाचखाऊ;
आत्म्यास राहण्याचे हे मागतात भाडे.'' ('प्रचिती', पृ. २७)

५.''काढा उपाय काही शोधून यार आधी;
किंवा खुशाल तोडा हे बंद दार आधी.'' ('प्रसंग', पृ. ३१)

६.''जमलेच तर तुला तू घ्यावा वसा सतीचा;
पोथी तशी कुणीही घेते छिनाल हाती.'' ('वषा', पृ. ४८)

७.''सरावा जन्म हा सारा अशा कैफात स्वानंदी;
निरागस लेकरू तान्हे जसे झोपेत हासावे.'' ('कायदा', पृ. ५८)

८.''सोबतीच जरी सर्व झाले पशू;
तू तरी वाग ना माणसासारखा !'' ('सर्व', पृ. ६२)

९.''वेडेपण हे करू नको;
विस्तव हाती धरू नको.'' ('पर्याय', पृ. ६८)

१०. ''ऐकवू नकोस तू तुझी नवी नवी गझल;
भोवताल मंडळी इथे महान चोरटी.'' ('भोवताल', पृ. ७१)

११. ''तुकारामा, अरे ह्यांना जरा तू हाण पैजारा;
मुखोटा लावुनी फिरती तुझ्या वेषात मंबाजी'' ('मंबाजी', पृ. ७४)

१२. 'लाख होउ दे सभोवताली उजाड बागबगीचे;
गाव फुलांचे मनात हसऱ्या अमुच्या वसते भाई.'' ('भाई', पृ. मलपृष्ठ)

श्रीकृष्ण राऊतांच्या गझलेत बोलीभाषेतील सहजता, प्रासादिकता, संवादात्मकता, गोडवा हे गुण ओतप्रोत आहेत. मात्र काही अल्प स्थळे अशी आहेत की, ज्या ठिकाणी अपरिचित शब्दांमुळे अर्थहानी होण्याचा धोका संभवतो. 'प्रचिती' (पृ. २७) ह्या गझलेतील 'नवाडे' हा शब्द, 'देव' (पृ. ४५) ह्या गझलेतील 'भुजून' हा शब्द, 'जाण' (पृ. ७०) ह्या गझलेतील 'घापला' हा शब्द व 'शुभेच्छा' (पृ. ७९) ह्या गझलेतील 'नवाई' हा शब्द ही ती अल्पस्थळे होत.

राऊतांनी आपल्या गझलांना शीर्षके देताना शेवटच्या द्विपदीतील एखादा शब्द निवडून तो शीर्षक म्हणून

योजलेला आहे. (अपवाद : 'पारदर्शी' ही गझल.) ही शीर्षके आटोपशीर आहेत. मात्र ती समर्पक वाटत नाहीत. अर्थात् हा दोष राऊतांचा कमी व 'गझल' ह्या काव्यप्रकाराचा अधिक, असे म्हणावे लागते. कारण नेहमीच्या कवितेत पहिल्या ओळीपासून शेवटच्या ओळीपर्यंत जो आशय आलेला असतो, तो एकाच विषयाला धरून आलेला असतो. त्यामुळे अशा ठिकाणी समर्पक शीर्षक निश्चित करता येते. गझलेत मात्र एकच एक विषय सर्व द्विपदींमधून हाताळलेला असतोच, असे नाही. म्हणून गझलेला शीर्षक देण्याच्या फंदातच पडू नये, असा एक मतप्रवाह आहे. मात्र शीर्षकामुळे काही एक सोय होत असते, हे नाकारता येत नाही.

थोडक्यात, श्रीकृष्ण राऊत ह्यांची गझल ही तंत्रशुद्ध आणि अस्सल मराठमोळ्या मराठी गझलेचा जिताजागता नमुना आहे. विदर्भाने मराठी गझलसृष्टीला अमृतराय, उ. रा. गिरी, सुरेश भट ह्यांच्यासारखे ज्येष्ठ व श्रेष्ठ गझलकार दिले; भीमराव पांचाळे व सुधाकर कदम ह्यांच्यासारखे दर्जेदार गझलगायक दिले; डॉ. राम पंडितांसारखे तळमळीचे गझल अभ्यासक दिले. श्रीकृष्ण राऊत हे ह्याच विदर्भातील आहेत आणि ते विदर्भाची ही उज्ज्वल परंपरा पुढे नेतील, इतकेच नव्हे तर ही परंपरा अजून अधिक उज्ज्वल करतील, असा भरंवसा त्यांच्या गझलेतून मिळत राहतो. त्यांच्या गझलेचे स्वागत सुरेश भट, वि. वा. शिरवाडकर, पु. ल. देशपांडे, ना. घ. देशपांडे, मंगेश पाडगावकर अशा अनेक 'दर्दी' ज्येष्ठांनी केलेले आहे. समस्त गझलप्रेमींनी तर केलेले आहेच. नुकतीच वयाची पन्नाशी पूर्ण केलेल्या राऊतांची भावी गझल त्यांच्या व्यक्तिमत्त्वाप्रमाणे दिवसेंदिवस अधिकाधिक परिपक्व, प्रगल्भ होत जाईल, असा विश्वास त्यांच्या विद्यमान गझलेमधून मिळत राहतो, ह्यातच सर्व काही आले !

**संदर्भ आणि टीपा :**

१. गुजर प्रदीप मुरलीधर (संपा.), 'कविता' (प्रातिनिधिक काव्यसंग्रह), प्रकाशक स्वतः संपादक, ठाणे, प्रथमावृत्ती : मार्च १९८१, पृ. ६ व ७.

२. भट सुरेश व कांबळे (सांगोलेकर) अविनाश (संपा.) 'काफला' (प्रातिनिधिक मराठी गझलसंग्रह), कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे. प्रथमावृत्ती : ऑगस्ट १९९०, पृ. १०१ व १०२.

३. कांबळे (सांगोलेकर) अविनाश (संपा.), 'गझलधारा' (प्रातिनिधिक मराठी गझलसंग्रह), कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ती : १९९४, पृ. ७८.

४. पांचाळे भीमराव व इतर (संपा.), 'कारवाँ' (प्रातिनिधिक मराठी गझलसंग्रह), ग़ज़लसागर प्रतिष्ठान, मुंबई, प्रथमावृत्ती : २ डिसेंबर २०००, पृ. १३३.

५. पंडित राम व पांचाळे भीमराव (संपा.), 'विदर्भाची मराठी गझल' (प्रातिनिधिक मराठी गझलसंग्रह), ग़ज़लसागर प्रतिष्ठान, मुंबई, प्रथमावृत्ती : ७ फेब्रुवारी २००४, पृ. १३० व १३१.

६. प्रस्तुत शोधनिबंधात राऊतांच्या गझलांचे पृष्ठांक नमूद करणार आहे ते 'गुलाल आणि इतर गझला' (फेब्रुवारी २००३) ह्या संग्रहामधील.

७. गझलकार श्रीकृष्ण राऊत हे स्वतः शारीरिकदृष्ट्या काहीसे अपंग आहेत. शिवाय 'गुलाल' व 'गुलाल आणि इतर गझला' ह्या दोन्ही गझलसंग्रहांना त्यांनी जी अर्पणपत्रिका जोडलेली आहे, तीत त्यांनी 'जीवनाशी सतत झुंज देत जगणाऱ्या जगातल्या तमाम अपंगांच्या जिद्दीला', अशा शब्दांमध्ये आपली भावना व्यक्त केलेली आहे.

८. पुणे येथे ३० ऑगस्ट १९८७ रोजी मी स्वतः भटांना समक्ष भेटलो असता त्यांना मी 'एकटी', 'भल्या पहाटे निघून आले' व 'सुन्या सुन्या मैफलीत' ह्या तुमच्या गझला खऱ्या अर्थाने गझला नाहीत, तर गझलेच्या आकृतिबंधातील नाट्यगीते होत, असे म्हटले असता ते त्यांनी मान्य केले होते.

❖❖❖

**डॉ. अविनाश सांगोलेकर**
प्रपाठक व मराठी विभागप्रमुख,
रयत शिक्षण संस्थेचे एस्.एम्. जोशी कॉलेज,
हडपसर, पुणे - ४११ ०२८.
भ्रमणध्वनी : ९८५०६१३६०२





अनुक्रमणिका

# लेखकाच्या आत्मनिष्ठ - कलात्म जडणघडणीचा आलेख : प्रार्थनेची घंटा

डॉ.किसन पाटील

कवी अशोक कोतवाल यांच्या 'मौनातील पडझड' या कविता संग्रहानंतर त्यांचा 'प्रार्थनेची घंटा' हा ललितलेख संग्रह प्रकाशित होत आहे. ही खरोखरच आनंदमय घटना आहे. कवितेतील अल्पाक्षरांचे बंधन झुगारून लेखन करताना ललित निबंधाला फुलण्यासाठी खूप संधी लेखकाला मिळते. काव्यमयता, लालित्य, भावरम्यता, रंजकता आणि वैचारिक चिंतनाला सुद्धा भरभरून फुलायची संधी ललित लेखक घेऊ शकतो. त्याचा प्रत्यय 'प्रार्थनेची घंटा' या संग्रहात आल्याशिवाय राहात नाही.

या संग्रहात एकूण पंधरा ललितबंध आहेत. सूर्यास्ताची वेळ, सावल्या, तिन्हीसांजा, प्रार्थनेची घंटा, पायवाटा, मन आणि आकाश, खिडक्या, भटकंती, क्षितिज आणि मी, बडबड व्यर्थ आणि सार्थ, धोंडी धोंडी पाणी दे, वेडा बाबू, अंबाबोयची ओसरी, दर्ग्यातील उग्र गंध, संदर्भाच्या शकून वेळा अशा विविध शीर्षकांनी नटलेले हे ललितनिबंध लेखकाच्या आत्मनिष्ठेसह त्याच्या भावभावनांचा आणि कल्पना रम्यतेचा आविष्कार म्हणावा लागेल. या ललित निबंधाच्या आत्मनिष्ठेला काही वेगळी परिमाणे लाभली आहेत. लेखकाच्या व्यक्तिमत्त्वाच्या जडणघडणीचा आलेख, बालमनातील निरागसता आणि क्रमाक्रमाने विकसित होत गेलेली वैचारिक प्रगल्भता, अनुभवांची विविधता व अस्सलता, चिंतनगर्भ चिकित्सकवृत्ती आणि निरीक्षणातून जीवनाचे आशयसौंदर्य टिपण्याची कलंदरवृत्ती, 'स्व'निष्ठ जाणिवेतून आलेली भावुकता आणि भाषेचा स्वतंत्र असा शैलीपूर्ण रेखाटलेला गोडवा, जीवनाची मधुरता चाखताना राखलेली तटस्थता अशा विविध परिमाणांनी या ललित लेखांकडे पाहावे लागते. आपल्या आत्मानुभूतीचं प्रकटीकरण करणं इतकाच लेखकाचा उद्देश नसून त्या जीवन जगण्याच्या वैविध्यपूर्ण शैलीचा पगडा या लेखनावर जाणवतो. आपल्या बाल्यावस्थेच्या भूतकालीन स्मृतींचा आलेख मांडताना त्यातील निरागसता आणि कालानुरूप विकसित होत गेलेली प्रगल्भ जीवन जगण्याची विजिगीषा या लेखनात सर्वत्र आढळते.

अशोक कोतवाल यांच्या मनाच्या गूढ-रम्य आणि तितक्याच संभ्रमित अवस्थांचे हे प्रांजळ सरळसोट परंतु शैलीदार वर्णन आहे. कवीमनात अनेक मनांची पुटे लपलेली असतात. एकएक खपली काढावी आणि नवनव्या चिजा सापडाव्या असे संपन्न परंतु भावपूर्ण अनुभव या मनस्वी लेखकाच्या अंतरंगीचा ठाव मांडून जातात. आपल्या अवतीभवतीचा समाज, त्यातील विविध रंगी-ढंगी माणसं, त्यांच्या लकबी-सवयी, वागण्याच्या चित्रविचित्र पद्धती, निसर्गाच्या छटा, आकाशाचे रंग आणि अंतरंग, पशू-पक्षांची हिरवी नाजूक बोली, नद्या, डोंगर, वृक्षराजी आणि सूर्यचंद्र तारे वारे यांच्यासह क्षितिजाला जाऊन भिडणाऱ्या पायवाटा, मंदीर, दर्गा आणि सणउत्सवांच्या परंपरेतील श्रद्धाळूवृत्तीच्या भावविभोर गमती जमती, लोकतत्त्वीय धारणा आणि चालीरीतींसह आलेल्या मौखिक गीत परंपरांचे वैविध्य, घंटांचे नाद, गीतांचे सूर, नृत्याचे ताल आणि वाद्यांची मनसोक्त लय पकडण्याची लेखकाची कलंदर परंतु संवेदनशीलवृत्ती यांचा सर्वांगसुंदर आविष्कार म्हणजे हे ललित लेख आहेत. साधू, बैरागी, वैदू, फकीर आणि वेडात धुंद झालेली माणसे, आपल्याच कोशात मश्गुल झालेले स्त्री-पुरुष, मुलांचे आणि लेखकाच्या भटकंतीच्या वृत्तीचे अनेक मासलेवाईक नमुने या लेखात पहावयास मिळतात. ही सारी माणसं, त्यांच्या आजुबाजुचा निसर्ग यांच्यातील एक गूढ अनाकलनीय नातं शोधण्याचा लेखकाचा प्रयत्न दिसतो. अनेक प्रश्नांची मालिका आणि त्यांची उत्तरे

शोधण्याचा अंतर्मुख होऊन विचार करणारी लेखकाची चिकित्सक वृत्तीच या लेखनाचे सेंद्रीय द्रव्य आहे. आत्मनिष्ठा, आत्मस्वर, आत्मचिंतन आणि आत्मशोध घेता घेता वाचकाला ही तादात्म्यता अनुभवायला लावणारे हे लेखन आहे. 'या हृदयीचे त्या हृदयी' भाव प्रकट करण्याचे सामर्थ्य घेऊन अशोक कोतवाल तरीही तटस्थता पाळतात. जिथे गूढता, चमत्कार आणि श्रद्धा अंधश्रद्धांचे प्रश्न उपस्थित होतात तिथे लेखक निर्णायक उत्तर न देता. असेल ही कदाचित, नसेल ही कदाचित असे मत व्यक्त करून वाचकांवर काही विचार करण्यासाठीची रम्य स्थळे सोपवून देतो. त्यामुळेच चमत्कृती आणि नवोन्मेषासह अस्वस्थता कायम ठेवण्याची हातोटी या ललित लेखनात आढळून येते. हेच त्याचे बलस्थान आहे. राजू बाविस्कर यांचे मुखपृष्ठ आणि त्यांच्या शैलीदार रेखाटनामुळे या ललितलेखांना दृक्प्रत्ययाची वेगळीच झळाळी प्राप्त झाली आहे.

संन्याशी आणि त्याचे चमत्कार, मळकट कपडे घातलेली वेडसर व्यक्ती, तिचे विद्रुप हसणे, घोड्यावरून येणारा व खाऊ वाटणारा बाबा, त्याचा खिंकाळणारा घोडा, सावल्या बघून विव्हळणारा दनू, देहभर भस्म लावलेला वैरागी, देशमुखवाड्यातील कथा सांगणारी तुकडाबोय, घोंगरवाला गोसावी, रोमडी (सुरूंगी) लावणारा वैदू, महादेवाच्या पिंडीवरील चिंचेचा (महू) चाखणारा साधू, पीरबाबाच्या दर्ग्यावर गुळाची शिरणी वाटणाऱ्या अम्मा आणि रम्मा, बोल बच्चा, इसमुठ्ठी में क्या है असा सवाल करणारा फकीर, बडबड करणारे दामू आण्णा आणि रामू तात्या, मुस्लीम सेवेकरी सांडूमियाँ, वाघासारख्या गुर्मीच्या डरकाळ्या फोडणारा दाजी, दाजीची पत्नी आणि त्याची रखेल व सुंदर मुलगी, इस मुठ्ठीमें संसार के सारे रंग भरे है.... असे सांगणारा संन्यासी अशा अनेक व्यक्तिरेखा, विविध प्रसंग आणि मानवाचे निसर्ग-नियतीशी असलेले गूढ नाते व्यक्त करण्याची कोतवाल यांची दुर्दम्य इच्छाशक्ती या लेखनातून व्यक्त होत जाते.







अनुक्रमणिका

अशोक कोतवाल यांची वर्णनशैली आणि संवादशैली ही सहज भाषेची रचना वाटते. कथात्मनिवेदन आणि व्यक्तींचा व्यक्तींशी आणि लेखकाचा स्वतःशी होणारा आत्मसंवाद हे या लेखनाचे भाषिक वैभव आहे. ''मी आजही एखादी नवी सावली पाहिली की अंतर्मुख होतो. माझ्या अंतर्मनात असंख्य संवेदनांच्या तारा झंकारू लागतात. त्याचा एकच नाद भरून राहतो–'' (पृ. २८) ''ते काहीही असो, परंतु त्या दिवसापासून मला माझा जन्म म्हणजे अर्धी भाकरी आणि माझा मृत्यू म्हणजे पूर्ण भाकरी असंच वाटू लागलं.'' (पृ. ३०) ''तशी हरेक सांज माझ्या देहातून गडप होते गात्रंनगात्र खिळखिळं करून वयाचा वृक्ष फोफावत जातो.'' (पृ. ३२)

''मी थरथरत होतो. एकदा देवळाकडे आणि एकतदा मठाकडे बघत होतो. मला कळत नव्हतं. ईश्वराकडे जाण्याची घंटा कोणती आणि ईश्वरापासून दूर जाण्याची घंटा कोणती ?'' (पृ. ४१) ''पोपटानं चाचे लावलेला पेरू हमखास गोड असतो अशी माझी शुद्ध धारणा होती.'' (पृ. ४५) ''माझ्या श्रद्धेविषयी मला उगाचच शंका येत राही. माझं जाणं एक स्वप्न होऊन कुठेतरी अधांतरी तरंगत असे. मी आस्तिक आणि नास्तिकच्या मध्यावर कुठेतरी भरकटत असतानाच अचानक पुन्हा एकदा दुसऱ्या पायवाटेजवळ घरंगळत जाऊन पडायचो.'' ''ते काहीही असो मी आज तरी मन, आकाश आणि मृत्यू या त्रिकुटाने तयार झालेल्या त्रिकोणात उभा आहे. मला खात्री आहे एक ना एक दिवस हे त्रिकुट हातात हात घेऊन माझ्या अगदी निकट येईल. त्याचा एक बिंदू होईल. तो माझ्या आनंदाचा सर्वोच्च क्षण असेल. म्हणून मी बिनधास्त आहे.'' (पृ. ५७) ''खिडक्या आपल्या आंतरिक विश्वाची आणि अंतर्मुख करणाऱ्या असंख्य, अतर्क्य अनुभवांची महाद्वारेच आहेत.'' (पृ. ५८). ''माझ्या घराच्या दारं खिडक्या सताड उघड्या करून माझ्या घराला उजेडाची आंघोळ घालतो'' (पृ. ६१) ''लाकडी कमान असलेल्या प्रचंड दरवाज्यातून वाड्यात आत ऐटीत शिरून जे जे दिसेल ते ते डोळ्यात साठवून घ्यावं.'' (पृ. ६३) ''या खिडक्या... उचलून उभं करतात, माझ्या सर्वांगात चैतन्य पेरून मला जगण्याचं नवं बळ देतात, नवी दिशा देतात.'' (पृ. ६७). ''क्षितिज हे एक शाश्वत सत्य आहे. कुणालाही न उलगडणारं कोडं आहे. जगातील सारे रस्ते हे क्षितिजातून सुरू होऊन क्षितिजातच गडप होतात.'' (पृ. ७९) ''व्यर्थ बडबड इतरांवर लादण्याचा प्रयत्न केला म्हणजे लोक तुला मूर्ख अथवा वेडा ठरवतात. परंतु सार्थ बडबड मात्र लोक स्वतःवर लादवून घेतात.'' (पृ. ८३) ''गुढीपाडव्याला बाबूनं दिलेल्या काठीवर गुढी सजवताना आजही त्याची आठवण होते.'' (पृ. १०२) ''अंबाबोय आणि चिंधाबोय... या दोन्ही म्हाताऱ्या खंगून खंगून मेल्या. मरण येत नाही म्हणून जगल्या. पण कधी त्यांनी नशिबाला दोष दिला नाही की देवाला वैरी म्हटलं नाही... त्यांचं या जगात येणं जितकं स्वाभाविक होतं तितकंच जाणं देखील... ('' (पृ. १२१) ''या दर्ग्यो बाल्यातून प्रौढत्वाकडे येण्यासाठी मला लांब पल्ल्याची सोबत केलेली आहे. तेव्हा हा दर्गा माझ्या अंतस्थ कुपीतील एक अत्तराचा फाया होऊन राहिलेला आहे. जो मी केव्हाही काढून हुंगून घेतो आणि चैतन्याच्या एका अनोख्या धुंदीने ओथंबू लागतो... '' (पृ. १२९) ''असेच कसले कसले संदर्भ मला छळत राहतात. माझी दमछाक बघत राहतात. मला भासही होतो. मला हवीहवीशी वाटणारी माझीच एखादी प्रतिमा माझ्या देहातून निघून जाते की काय ? आणि तसं होत असेल तर मग यापेक्षा आणखी मोठं दुःख कोणतं असू शकतं ?'' (पृ. १३२)

कवी अशोक कोतवाल यांचा हा ललितलेखसंग्रह असा भाषिक प्रगल्भतेचा व त्यांच्या भावपूर्ण निखळ प्रांजळ शैलीचा आविष्कार वाटतो. त्यांच्या कवितेच्या पेक्षाही अधिक काव्यमय, चिंतनशील आणि भावस्पर्शी असे हे लेखन आहे. त्यात लेखकाचे व्यक्तिमत्त्व, चिंतनगर्भता आणि कलात्मक आविष्काराच्या प्रगतीची उत्तरोत्तर होत जाणारी जडण घडण सहजगत्या प्रकटताना दिसते.

❖❖❖

**डॉ. किसन पाटील**

'अक्षरवेल', ९/५४-२ शिव कॉलनी, जळगाव, ४२५००२.

●

'प्रार्थनेची घंटा' (ललित लेख संग्रह) अशोक कोतवाल
पद्मगंधा प्रकाशन, पुणे. पृष्ठे : १३४, मूल्य : १२०/-

# ‘ओऍसिस’ - कुंपणातील वेदनांचं !

सौ. सीमा होसूरकर

मारूती कटकधोंड, एक संवेदनशील मनाचा कवी, माणूस म्हणून जगताना वेदनेच्या कुंपणात म्हणजेच समाजातल्या उपेक्षित, गरीब परिस्थितीचे चटके सहन करून जगणाऱ्यांशी त्याचं भावनिक नातं आहे. वेदनेच्या कुंपणात जे काही सारं सहन करून, तग धरून आहेत त्यातूनच ‘हिरवळ’ दिसतीयं अशा घटकांना कवितेतून धीराचे बोल देण्याचा प्रयत्न या काव्यसंग्रहात दिसतो. कविता ही केवळ ‘शब्दक्रीडा’ नाही तर कवीला आलेल्या कडू-गोड अनुभवांचा ‘श्वास’ आहे.



*जखमांची दलदल*
*अश्या अनेक उपेक्षित वस्त्या कण्हत आहेत*
*शापित जखमा अश्वत्थाम्याच्यासारख्या*
*आरशाच्या आतील धडका वाढत आहेत*

(वस्ती पृष्ठ क्र. १)

समाजातल्या अनेक घटनांचे, घटकांचे साद-पडसाद प्रत्येकाच्याच मनावर आघात करतात, पण कवी म्हणून जगताना आलेले अनुभव हे जरा जास्तच मनावर ओरखडतात. आपल्या समाजव्यवस्थेने अन्याय, अत्याचार केले तो उपेक्षित वर्ग आज शिक्षणाने, जागृतीने अन्यायाविरूद्ध लढा देण्यास सिद्ध झाला आहे. त्याचं वास्तव सर्वत्र दिसतंय, त्याचीच नोंद कवीने ‘वस्ती’ ह्या कवितेतून नोंदवली आहे.

*हे सुख, ही समृद्धी तुझ्याच मायेचं फळ आहे*
*आई, तू वेचलेल्या खड्याखापराचं*
*आज हातात सोनं झालं आहे.*

(आई पृष्ठ क्र. २८)

आईबद्दलची आपली सश्रद्ध भावना व्यक्त करताना कवीच्या आईने पूर्वायुष्यात जे अपार कष्ट करून मुलांना सामाजिक प्रतिष्ठा मिळवून दिली. त्याबद्दल कवीच्या मनात असलेली आईबद्दलची भावना अंतःकरणाचा ठाव घेते, वेदना देते, त्यामुळेच ही कविता ‘वाङ्मयीन मूल्यांच्या’ दृष्टीने श्रेष्ठ वाटते.

सध्याच्या चंगळवादी व भौतिक सुखाच्या मागे लागून माणसं दिवसेंदिवस आत्ममग्न, भोगरसिक होत आहेत. त्यावद्दलची खंत ‘भ्रमर’ या कवितेतून व्यक्त होते. आकाराने लहान पण आशयाने मोठ्या, त्यातल्या विदारकाचे प्रत्ययकारी चित्रण कवीने खिन्नपणाने केले आहे. एका वादळी काळ्या भ्रमरानं कळीला कुस्करून टाकलं तेव्हा फुलांची बाग कोमेजून गेली. हे आजच्या तरुणाईला थोडंसं भान आणण्याचं काम या कवितेतून दिसतं.

*दीन-दुबळ्याचा सखा व्हावं*
*राधेचा कृष्ण व्हावं*
*झाडाचं पान व्हावं*
*गळणाऱ्या पानाशी हितगूज करावं*

(असं होत नसतं, पृष्ठ क्र. ६९)

कविमन, अतिशय प्रांजळ, पक्व आहे याची प्रचिती ह्या कवितेद्वारे येते. समाजातल्या उणिवांवर बोटं ठेवताना समाजातल्या चांगल्या प्रवृत्तींचं स्वागत, कौतुक करण्यासाठी कवीचं मन मोठं देखील आहे. ‘आपलं कोणीतरी या जगात आहे.’ हा आशावादच जगण्याला उभारी देतो.

वर्षाऋतुचं विलोभनीय सौंदर्य हे नेहमीच कवीमनाला भुरळ पाडतं. हवाहवासा वाटणारा पाऊस आणि हा... हा कार पाऊस ! दोन्हीही प्रकारच्या कविता कवीने उद्धृत केल्या आहेत.

*आता थांब रे पावसा*
*झाले दिन चार*
*नसे कुठे कामधाम*





अनुक्रमणिका

*धनी तापाने बेजार*

(आला डोळ्यास पाऊस, पृष्ठ क्र. ५०)

ह्या कवितेतून पूरग्रस्तभागातील दृश्य डोळ्यासमोर येते. आणि नकळत इंदिरा संताच्या 'नको नको रे पावसा' ह्या ओळींची आठवण करून देते तर

*मोत्याची माळ तुटून विखरावी*
*तसा पाऊस तुझ्या रेशमी केसांमधून*
*मोत्यासारखा टपटपतो*

(तू पावसात भिजताना, पृष्ठ क्र. ४७)

ह्या कवितेतील शब्दांची नजाकत मोठी विलोभनीय आहे. 'सखीचं पावसात भिजणे' हे आडोश्याला उभं राहून केलेलं वर्णन अत्यंत तरल, नाजूक, भावविभोर ! ह्या पाऊसधारा रसिकांना रोमांचित करतात.

*तुला वाटलं...*
*मी सदा जवळ असावं*
*म्हणून तू झालीस माझी प्रतिभा*
*माझी कविता फुलविण्यासाठी*

(तुला वाटलं, पृष्ठ क्र. ३५)

प्रेमभावना व्यक्त करताना बासरी, फुलवेल, दीपज्योत अशा अनेक प्रतिमांचा वापर अतिशय नाजूक, तरलतेने केला आहे तर 'तुझ्या घरावरून', 'स्पंदन', 'सखी' अशा अनेक कवितांना कवीचा 'निर्मलस्पर्श' झाल्यानेच संयमातली उत्कटता जाणवते.

विचारवैविध्यापेक्षा भावोत्कटता, सुयोग्य वृत्तरचना, समाजप्रवण मनोवृत्ती ह्या दृष्टीने तोरण, दुःख, ऊसतोडीचा मौसम, प्रदक्षिणा, कुंपण वेदनांचे (शीर्षक कविता) विशेष लक्षणीय आहेत.

साध्या, सोप्या, दुर्बोधतेचा फार लवलेश नसलेल्या मारूती कटकधोंड यांच्या कविता केवळ सुवासाच्या गंधकोषात किंवा आत्मकोषात न राहता सामाजिक परिस्थिती, दुःख, वेदना, आकांत ह्या सर्वांशी नातं जोडून आहे. हे एक संवेदनशील मनाचं प्रतीक असून 'कुंपणातल्या काही वेदना' रसिकांना वेदना देणाऱ्या आहेत.

❖❖❖

**सौ. सीमा होसूरकर**
१६२/१९/बी, रेल्वे लाईन,
चंद्रकिरण अपार्टमेंटस,
शांतिसागर मंगल कार्यालयाजवळ,
सोलापूर - ४१३ ००१.

●

'कुंपण वेदनांचे' - मारुती कटकधोंड
सुविद्या प्रकाशन, सोलापूर - मूल्य : ६० रु.

---

## नवीन आजीव सभासद

१) इनामदार अंजली अशोक (निगडी)
२) गुप्ता पूनम रामहुजुर (आकुर्डी)
३) कुरकुरे सुनंदा अनंत (चिंचवड)
४) चुत्तर राजेंद्र धनंजय (चिंचवड)
५) चुत्तर कांतिलाल धनंजय (चिंचवड)
६) पाटील किसन दयाराम (भोसरी)
७) सुतार गीता श्रीधर (आकुर्डी)
८) जावेद रमजान शेख (आकुर्डी)
९) गायकवाड राम केरू (मोशी)
१०) डांगे राधिका शरदचंद्र (पुणे)
११) शिर्के संतोष विठोबा (अहमदनगर)
१२) गरूड विनय देवदास (पुणे)
१३) बेडेकर महेश विजय (ठाणे)
१४) परांजपे अल्पना मिलिंद (ठाणे)
१५) दुर्वे राणी रवींद्र (ठाणे)
१६) जोशी केदार नरहर (ठाणे)
१७) भोसेकर सुनंदा मोरेश्वर (ठाणे)
१८) जोशी विजय सखाराम (ठाणे)
१९) पाटील प्रमोद सीताराम (जळगाव)
२०) पाटील रेखा प्रमोद (जळगाव)
२१) दिवेकर सुनील सदाशिव (पुणे)
२२) सोनाळकर अरुण परशुराम (कौलव)
२३) पाटील दीपक परशराम (पुणे)
२४) इंगळे नरेंद्र शिवबाळा (सोलापूर)
२५) कुलकर्णी बाळासाहेब माणिकराव (सोलापूर)
२६) गबाळे शुभांगी प्रसाद (पुणे)
२७) कुलकर्णी अनुराधा गोविंद (पुणे)
२८) सुतार रोशन दिलीप (निगडी)
२९) देशपांडे प्रविण प्रल्हाद (पुणे)
३०) फडके भालचंद्र भास्कर (टिटवाळा)
३१) लिंबाळे शरणकुमार (सांगवी)
३२) बर्वे दिलीप दत्तात्रय (पुणे)
३३) मोमया ललित लक्ष्मीकांत (अमळनेर)
३४) जोशी बंडा दत्तात्रय (पुणे)
३५) मांगले सुरेश केशव (पुणे)
३६) गोखले माधव यशवंत (पुणे)
३७) खैरे निखील माधव (पुणे)

❖❖❖










# 'जॅकपॉट' - एक वादळनिर्मिती

**प्रा. पद्माकर पुंडे**



''हॉसरीसिंगमध्ये कुणाला पैसे मिळतात हे मला कधीच खरे वाटले नसते. परंतु सरिता वाकलकर यांचे 'जॅकपॉट' हे पुस्तक वाचले अन् दोन गोष्टी पटल्या - एक हॉर्स रेसिंगमध्येही पैसे मिळतात अन् दुसरे म्हणजे हे पैसे योग्य रीतीने गुंतविल्यास त्यातून भरीव विधायक कार्याची निर्मिती होते.'' हे उद्‌गार आहेत केंद्रीय मंत्री श्री. शरद पवार यांचे ! प्रसंग होता सरिता शंकरराव वाकलकर यांच्या जॅकपॉट या पुस्तक प्रकाशनाचा. जॅकपॉट म्हणजे आत्मचरित्र नाहीय् तर ते अनुभवकथन आहे. हे अनुभवकथन आहे एका क्रांतीकारी जीवन जगत असलेल्या स्त्रीचे ! पन्नास वर्षांपूर्वी स्वतंत्रपणे आंतरजातीय विवाह करणे. सत्तेचाळीस वर्षे संसाराच्या एका वेगळ्या मार्गाने वाटचाल करणे, त्यात जगावेगळ्या हॉसरीसिंगच्या मार्गावरून प्रसंगी पतीच्याही पुढे जाणे, माहेर-सासर याकडील कुणीही साथीला नसताना हिंमतीने संसार करून मुलांना सुसंस्कारित व कर्तृत्ववान बनविणे- सारेच काही वाचणाराला चकीत करणारे आहे. खरे तर वाचकाला म्हणण्याऐवजी ऐकणाराला चकीत करणारे आहे. गुंगवून टाकणारे आहे असेच म्हणावे लागेल कारण सरिता वाकलकर यांचे हे अनुभवकथन इतक्या सहज, ओघवत्या, अनौपचारिक व जिव्हाळ्याच्या शैलीत आहे की हे आपण प्रत्यक्ष ऐकतो आहोत असे वाटावे ! जॅकपॉट हे आत्मचरित्र नाही अन् म्हणून ते खरे आहे, हे अनुभवकथन आहे म्हणून ते प्रामाणिक आहे, हे सहजशैलीत आहे म्हणून ते एखाद्या मन गुंतवून टाकणाऱ्या कादंबरीसारखे आहे. Facts are stranger than fiction असे म्हणतात ते या अनुभवकथनास तंतोतंत लागू पडते. सुमारे तीनशे पानांचे, आकर्षक बांधणी व मांडणीचे हे पुस्तक एकदा वाचायला सुरुवात केली की खाली ठेवावेसे वाटत नाही. पन्नास वर्षांपूर्वीचे पुण्याचे सामाजिक, सांस्कृतिक वातावरण, स्वतंत्रपणे विवाह अन् तोही आंतरजातीय असा करण्याचा धाडसी निर्णय घेतल्यावर करावा लागलेला कौटुंत्रिक, सामाजिक संघर्ष, हॉसरीसिंगच्या वेगळ्या वाटेवर यशस्वीपणे चालण्याचा निर्णय, मुलांना वाढवत असताना शैक्षणिक, सामाजिक क्षेत्रात करावा लागलेला संघर्ष, स्वभावभिन्नतेतून कौटुंत्रिक कलह निर्माण होऊ नये व त्यासाठी जिद्दीने, निश्चयाने निर्माण केलेले घरपण, मुलांवरचे संस्कार, हे सर्व करत असताना देशपरदेशात काढलेल्या सहली व त्याचे अतिशय वेधक, वाचनीय वर्णन- हे सारे आपल्यासमोर पानापानातून उलगडत असताना जणूकाही सरिता वाकलकर समोर बसून आपणास हे सारे कथन करीत आहेत असे वाटते.

सरिता वाकलकर यांचे हे आत्मकथन इंद्रधनुष्यासारखे आहे. त्यात पन्नास वर्षांपूर्वीच्या पुणेरी समाजजीवनाचे चित्रण आहे, कौटुंबिक आनंद सोहळे, प्रसंगी संघर्ष अन् त्यातून एका भक्कम घराच्या निर्मितीचे रंग आहेत. हॉसरीसिंगमधील थरार आहे, मन मोहून टाकणारे प्रवासवर्णन आहे अस् सर्वात मोहक रंग आहे तो परिस्थितीशी दोन हात करीत ठामपणे व यशस्वीपणे उभे राहून यशाकडे झालेल्या वाटचालीचा. अगदी सुरूवातच आपल्याला खिळवून टाकते. त्या लिहितात ''माझा जन्म स्वातंत्र्यपूर्व काळातला ! नामदेव शिंपी समाजातल्या एका सधन आणि प्रतिष्ठित कुटुंबात मी जन्माला आले. जातीचा मुद्दाम उल्लेख करण्याचे कारण त्या काळात ब्राह्मणेतर समाजातली कुटुंबे सधन असली तरी, त्यांचे विचार, शिक्षण या बाबतीत ती काळाच्या मागे आणि रूढी परंपरेला घट्ट चिकटून जगणारी असायची. अशाच एका कुटुंबातल्या सख्ख्या-सावत्र भावंडातली मी एक ! आधुनिक विचार आणि स्वतःला पटेल तेच करण्याचा स्वभाव, यामुळे त्याकाळच्या सर्वसामान्य मुलींपेक्षा माझ्या आयुष्याचा प्रवाह वेगळ्या दिशेला वळला.'' इथेच आपली पुस्तकावरची पकड घट्ट होते. आत्मचरित्र लिहायला मी काही कुणी

प्रकाशझोतातली व्यक्ती नाही. असे नम्रपणे सरिता वाकलकर म्हणत असल्या तरी आजच्या कौटुंबिक, सामाजिक, शैक्षणिक अंधःकारात प्रकाशझोत टाकणारे त्यांचे जीवन आहे हे नक्की ! आणि म्हणूनच पुस्तकाचा शेवट प्रभावीपणे आपल्या मनात कायमचा राहतो. त्या लिहितात, ''आज माझं वय अडुसष्ट वर्षे आहे. या अडुसष्ट वर्षात मी जसे माझ्या वैयक्तिक आयुष्यातले चढ उतार सोसले, तशीच देशातली, पुण्यातली अनेक सामाजिक स्थित्यंतरेही पाहिली. माझं आजवरचं आयुष्य अनुभवाने समृद्ध, आर्थिकदृष्ट्या समाधानकारक तरीही काहीसं अस्थिर होतं. आयुष्याबद्दलचं माझं तत्त्वज्ञान मला सर्वांत महत्त्वाचं वाटतं. मन लावून काम केलं तर कोणत्याही क्षेत्रात आपण बरंच काही करून दाखवू शकतो.'' वैयक्तिक आयुष्यातील चढउतार जन्मापासूनच सुरू झाले. पापभीरू व दयाळू स्वभावाचे वडील, दोन आया, अनेक भावंडे, प्रतिकूल वातावरणातही जपलेला शाकाहार, शाळेतील संघर्ष अन् या सर्व गोष्टींबरोबरच त्या काळात केलेला काशीयात्रेचा प्रवास हे सर्व वाचताना कौटुंबिक वर्णन व सामाजिक, प्रवास वर्णन यांचे रंग एकमेकांना खुलवतात. सरिता वाकलकर सहजपणे लिहून जातात 'माझी आई गमतीने नेहमी, म्हणत असे, हिच्यासाठी ब्राह्मण मुलगाच शोधावयास पाहिजे (पुढे मला खरंच ब्राह्मण नवरा मिळाला. पण तो मासे-मटण काय अगदी मद्यपानसुद्धा करणारा)' याचबरोबर पती निधनानंतर दोन वर्षांनी त्या लिहितात, ''११ ऑक्टोबर २००५... आज ह्यांना जाऊन दोन वर्षे झाली... या काळात मी एका सेकंदासाठीही ह्यांना विसरू शकले नाही. पण मी सतत सगळ्यांसमोर त्यांच्या आठवणींचे रडवे उसासे टाकत बसत नाही... कारण मुलांच्यावर परिणाम होतो. खरं तर जन्माला येतानाच एक गोष्ट निश्चित असते ती म्हणजे मृत्यू... असं असताना सुद्धा आपल्या जवळचं माणूस गेल्याशिवाय त्याची भयानकता कळत नाही. मला माझ्या माहेरी २५ वर्षे पाय ठेवता आला नाही. पण आमच्या सत्तेचाळीस वर्षांच्या संसारात ह्यांनी मला कधी माहेरची आठवणही येऊ दिली नाही... आयुष्यभर राग-लोभ, भांडण-रूसवे हे सर्व चालू होते तरीपण असे कधीच झाले नाही, की एकमेकांना सोडून आम्ही रागाने दूर गेलोय. कितीही टोकाचे वादविवाद झाले तरी संध्याकाळी ते घरी येत, मी मुकाट्याने त्यांना जेवायला वाढी आणि अबोला दूर होई.'' यापेक्षा आदर्श संसाराचे चित्र दुसरे कुठले असणार ? ज्या धीराने सुरूवातीला वैवाहिक जीवनात सरिता यांनी शंकरराव यांच्याबरोबर वाटचाल केली त्याच प्रेमाने त्यांनी त्यांना जीवनभर सांभाळले. संसारात चढउतार आले- अनिता, तरिता, चेतन यांनी संकटात डगमगून न जाता खंबीरपणे उभे राहून आपल्या क्षेत्रात कर्तृत्वाने स्थान निर्माण केले. ३०-३५ वर्षांपूर्वी जॅकपॉटच्या पैशातून घेतलेल्या वाकड येथील जागेवर 'इंदिरा ग्रुप ऑफ इन्स्टिट्यूटचा' वृक्ष बहरला. अनिता बरोबर जगप्रवास करून तिच्या कर्तृत्वाची फळे चाखताना तिच्या अकाली मृत्यूचा कडू घोट गिळावा लागला; कारण आता नातवंडांना सांभाळणे व समजावणे हेच महत्त्वाचे ठरले. रेसकोर्सवर सामाजिक नजरांचे चढउतार तसेच सामाजिक, शैक्षणिक कार्याचाही 'चढ' उभारला. बालपण, शालेय जीवन व विवाह या लाखमोलाच्या दिवसांचे कथन खरोखरच आपल्याला खिळवून टाकणारे आहे. जगावेगळ्या संसाराची सुहानीसफर, वेगळ्या वाटेवरील जॅकपॉट, मुलांच्या संगोपनातून उमललेला अंकुर, मन गुंतवणारे 'अराउंड द वर्ल्ड' हे प्रवासवर्णन, मुलांवर संस्कार करतानाची जडणघडण, संघर्षातून प्रकाशाकडे जातानाचे 'तमसो मा ज्योतिर्गमय' हे भावभावनांचे कल्लोळ, तरिता, अनिता बरोबरची आकाशझेप, इंदिरा ग्रुपचा वाढलेला, बहरलेला वृक्ष पाहतानाची कर्तव्यपूर्तीची भावना अन् समाजाला दिशा देणारे जीवन-मृत्यूचे तत्त्वज्ञान हे सारेच अगदी मनाला भिडणारे आहे, वाचनीय आहे. वादळ येऊन गेले की विध्वंस होतो; पण जॅकपॉटच्या या वादळातून मात्र नवनिर्मिती झाली आहे, विधायक कार्य निर्माण झाले आहे. म्हणूनच जॅकपॉटला दीपस्तंभ म्हणावेसे वाटते.

❖❖❖

**प्राचार्य पद्माकर पुंडे**
साईदत्त रेसिडेन्सी, बी बिल्डिंग, ए विंग,
फ्लॅट नं. २३, बाणेर, पुणे ४११ ०४५.

# 'एका साळियाने' काढला तेलुगू साडीवर मराठी कशिदा

शांतिलाल भंडारी

'एका साळियाने' हे कवी लक्ष्मीनारायण बोल्ली यांचं आत्मकथन त्याच्या शीर्षकामुळं वाचण्याची उत्कंठा निर्माण झाली. लक्ष्मीनारायण बोल्ली या नावाशी तसा मी अनेक दिवसांपासून परिचित आहे. सोलापूरच्या एका धावत्या भेटीत लक्ष्मीनारायण बोल्ली यांच्या घरी मी उभाउभी गेलो होतो व त्यावेळी त्यांची आणि माझी प्रत्यक्षात ओझरती ओळख झालेली होती. लक्ष्मीनारायण बोल्ली या नावाचं कौतुकही बरेच दिवसांपासून होतं. या कवीची जात कोणती हे समजून घेण्याच्या भानगडीत मी कधीच पडलो नाही. बहुधा हे गृहस्थ अमराठी असावेत अशी समजूत आधीपासूनच होती. पुढं यांचे मैफल व झुंबर हे काव्यसंग्रह वाचण्यात आले होते व ते चांगले आठवणीतही राहिले होते. आणि असा हा अमराठी माणूस 'तेलुगुच्या वेली । मराठी फुलली।। ओंजळ भरली कवितांनी।।' अशा सारख्या मराठी भावस्पर्शी कविता प्रगल्भ प्रतिभेने कसा करतो याचं आश्चर्यही वाटत होतं. या माणसाची जात कोणती हे ठाऊक नव्हतं; तरी याची जात कवीची आहे, हे मात्र याच्या कवित्वानं पुरंपुरतं ध्यानीमनी बिंबवलं होतं.

'एका कोळियाने' या कवितेतला कोळी मुंबईचा कोळी नसून स्वतःच्या अगांतून तंतू काढून त्या तंतूंनी स्वतःसाठी नक्षीदार जाळीचं घर बांधणारा कोळी. अंगातून काढलेल्या धाग्यांनी हा जाळं विणतो म्हणून या कोळ्याला कोष्टी असंही म्हणतात. गंमत ही की, वस्त्रोद्योगात सनगर, कोष्टी आणि साळी अशा विणकरांच्या जाती आहेत. घोंगडी-कांबळी सारखे जाडे भरडे वस्त्र अर्थात सणंग जे विणतात ते सणगर किंवा सनगर. धोतरं, पागोटे यासारखी सुती मांजरपाट वस्त्रे जे विणतात ते कोष्टी. आणि जरी रेशमी साड्या य़ासारखी तलम वस्त्रे व नक्षीदार चादरी जे विणतात ते साळी. साहजिकच कला गुणाने साळी हे विणकरांत अधिक कुशल. 'एका साळियाने' 'एका कोळिया'ची प्रकर्षाने आठवण करून दिली ती अशी. आणि ज्यांची अलौकिक जात कवींची आहे व लौकिक जात आत्तापर्यंत ठाऊक नव्हती किंवा ती समजून घेण्याच्या प्रयत्नही केला नव्हता ते लक्ष्मीनारायण बोल्ली साळी समाजातले असल्याचा उलगडा 'एका साळियाने' या ग्रंथनामाने केला.

स्वातंत्र्योत्तर काळातल्या साठोत्तरी साहित्य सर्जनतेचं एक विशेषत्व हे की, पिढ्यान्‌पिढ्या पिचलेल्या, दवलेल्या तळागाळातल्या समाजांतील माणसं आपली दुःखं निडरपणे व निर्भीडपणे बोलू लिहू लागली. पुरुषी वर्चस्वाखाली भरडली, कुचळली गेलेली स्त्रीही आपली वेदना सांगू लागली. दलित आत्मकथनांबरोबर स्त्री आत्मकथनांचीही भर पडत गेली. दुःखितांच्या आत्मकथनांनी अशी सामाजिक कोंडी फोडली. आपल्यालाही काही सांगायचंय या तीव्र जाणीवेनं इतरही अनेक लिहू लागले. नाट्यचित्र सृष्टीतले रंगकर्मी, राजकारण-समाजकारण अशा क्षेत्रातले कार्यकर्ते अशांना आत्मकथन लेखनासाठी स्फुरण मिळत गेले. अशाच ऊर्मीतून जसे कामगार लिहू लागले तसे उद्योजकही लिहू लागले. वाचकही ही आत्मकथने सहानुभूतीने, सहृदयतेने, आवडीने वाचू लागले. वाचकांना मंत्रमुग्ध करण्याची क्षमता आत्मकथन या साहित्यप्रकारात असल्याने कथा-कादंबऱ्यासारखा उत्कंठा वाढवणारा हा साहित्यप्रकार दिवसेंदिवस अधिकाधिक लोकप्रिय होत गेला. चाकोरी बाहेरचं जीवन जगणारांची व नवख्या जगाची आणि नवनव्या अनुभवांची ओळख करून देणारांची आत्मकथने वाचकांच्या जिज्ञासेचा व प्रशंसेचा विषय होऊ लागली. कविमनाच्या लक्ष्मीनारायण बोल्ली यांनी 'एका साळियाने' हे आत्मकथन लिहून असंच कुतूहल जागं केलं आणि साळी समाजाला समजून उमजून घेण्यासाठी वाचकांना उत्कंठित केलं ते 'एका साळियाने' या चित्तवेधक व मनोवेधक नावानं.

ज्यासाठी समाजातल्या एका साळियाने हे

आत्मकथन केले ती साळी जात पिढ्यान्‌पिढ्या शापित कशी या विषयीची एक लोककथा लक्ष्मीनारायण बोल्ली यांनी पहिल्याच पानावर दिलेली आहे. समस्त साळी समाजाला श्री लक्ष्मीदेवीने शाप दिला की, 'अनेक पिढ्या तुम्ही साळी लोक असेच अर्धनग्न स्थितीत अर्धपोटी राहात वस्त्रे विणत राहाल.' देवीने दिलेला शाप खूप काही शिकवणारा आहे. 'तुम्ही कष्ट करीत राहाता आणि तुमच्या कष्टाचा बहुतांश लाभ तुम्ही विणलेल्या वस्त्रांची विक्री करणारे व्यापारी घेतात.' ही वस्तुस्थिती जणू देवीने या शापवाणीतून साळियांच्या लक्षात आणून दिली. 'तुमच्या कष्टाचा योग्य परतावा मिळावा' यासाठी तुम्ही जागरूक व प्रयत्नशील रहावयास हवे' असाच परामर्श जणू देवीने या लोककथेतून दिलेला आहे. तेव्हा देवीची ही केवळ शापवाणी नाही, तर साळियांनी अर्धनग्न व अर्धपोटी राहू नये यासाठी ही चेतावणी होती. लक्ष्मीनारायण बोल्ली यांनी ही लोककथा देऊन साळियांच्या दुर्दशेचं व अपकर्षाचं दर्शन घडवलंच आणि आत्मकथनाचं प्रयोजनही मोठ्या युक्तीनं विशद केलेलं आहे. 'त्या तमाम शापित साळियांना' बोल्ली यांची हे आत्मकथन अर्पण केलेलं आहे हेही अर्थपूर्ण व औचित्यपूर्ण आहे. 'जिनी बिनी चदरिया। काहे का ताना, काहे के भरनी।...' हा यानंतर दिलेला कबीराचा दोहा औचित्यात भरच घालतो.

'एका साळियाने' या आत्मकथनाच्या आरंभी 'धोटा फेकण्याआधी' हे जे प्रास्ताविक रूपात मनोगत आहे त्यात लक्ष्मीनारायण बोल्ली म्हणतात त्याप्रमाणे पद्मशाली तेलुगू लोकांच्या जीवन-नाट्याविषयी, त्यांच्या संस्कृतीविषयी कुठं लिहून आल्याचं वाचनात नाही. या आत्मकथनाचं उद्दिष्टच जणू त्यांनी चतुराईनं सांगितलं आहे. म्हणूनच हे आत्मकथन वाचण्याची इच्छा होणे व ओढ लागणे स्वाभाविक आहे.

'एका साळियाने' हे आत्मकथन तसं बहुरंगी व बहुआयामी आहे. बोल्ली कुटुंबात शंभर वर्षे ज्या उद्वेगजनक, चित्तथरारक व भयकंपक घटना घडल्या त्यांचा आढावा प्रारंभीच्या भागात आहे. आंध्र प्रदेशातल्या तेलंगणातलं मूळगाव गुंडाराम येथून लक्ष्मीनारायण बोल्ली यांचे आजोबा नरसय्या यांच्या खडतर जीवनाची संकटग्रस्त कथा वाचताना अंगावर भीतीने, त्याचबरोबर संतापाने असंख्य काटे तरारतात. गुंडाराम गावावर त्या गावचा मुकुट नसलेला राजा, चक्रवर्ती, सर्वेसर्वा, भूस्वामी पेद्दादोरा विजयराघव रेड्डी या गुंडक्रूरकर्म्याची भयानक दहशत होती. लोकांच्या जीवांशी उलट्या काळजाने खेळण्यात या पेद्दादोराला असूरी आनंद मिळत असे. वेठबिगारांच्या नववधूला पहिली रात्र पेद्दादोराच्या देवडीत सजवावी लागत असे. अशा नवयुवतीच्या घाटदार शरीरावरून खवखवती वळवळती नजर फिरवण्यात या धटिंगणाला शरम वाटत नसे. या असभ्य भोग विलासी ऐयाशीला कुणी विरोध केला तर आपले तांबारलेले मोठाले इंगळासारखे डोळे लोकांच्या चेहऱ्यावरून धारदारपणे फिरवण्यात, प्रसंगी अमानुषपणे यांची कातडी सोलण्यात याला राक्षसी समाधान मिळत असे. निजामाची जुलुमी राजवट बरी असं जाणवून देणारा हा निजामाच्या अमलाखालील त्या काळच्या तेलंगणातला क्रौर्य करून शौर्य गाजवणारा पेद्दादोरा !

दर दसऱ्याला पेद्दादोरा ठरवील त्या कोणा एका माणसाची व वाघाची झुंज लावून ती प्राणघातक झुंज बघण्यात पेद्दादोराला अघोरी सुख मिळत असे. शंभर वर्षांपूर्वीच्या अशाच एका दसऱ्याला वाघाची झुंज बोल्ली आनुला नरसय्या याच्याशी लावून देण्याचा आदेश पेद्दादोरा विजयराव रेड्डी याने दिला. तशी नरसय्याची झोपच उडाली. या सुलतानी आपत्तीतून सुटका करून घेण्यासाठी नरसय्यानं म्हातारा बाप मल्लय्या याला पाठीवर घेऊन त्या भयानक काळरात्री गुंडाराम गाव सोडलं. कामारेड्डीचं शिवार आल्यावर नरसय्यानं बापाला सांगितलं की त्यानं तिथला मोठा भाऊ वीरय्याकडे जावं व धाकटा भाऊ गुंडय्या तिथला दोरा कांतारावु रेड्डी त्याच्या आश्रयाला जाऊन साले वाड्यातल्या-साळीवाड्यातल्या-हातमागावर काम करावं. बापाला असं सुचवून नरसय्या स्वतः मजल दरमजल करीत व अशा हाल अपेष्टात निजामाच्या हद्दीतलं झेहराबाद मागं टाकून सोलापूरला पोचला.

नरसय्याची ही स्थलांतराची मती गुंग करणारी कथा भयकातर करणारी व चित्त आणि गात्रे थरारून टाकणारी

आहे. हा थरारक प्रसंग अर्थासह तेलुगू आणि अर्थपूर्ण मराठी भाषेत शब्दबद्ध करण्यात लक्ष्मीनारायण बोल्ली कमी पडले नसल्याने 'एका साळियाने' मधला हा शरीर आणि मन गोठवून टाकणारा भयंकर प्रसंग काळजाला घरे पाडणारा आहे.

आयुष्याची विस्कटलेली घडी पुनश्च व्यवस्थित बसवण्यासाठी नरसय्यानं सोलापुरातल्या पद्मशाली साळी जातीतल्या किष्टय्याशी स्नेह जुळवून सुलाकुंटींच्या हातमागाच्या कारखान्यात काम मिळवलं. त्याच्या कसबाचं आणि कष्टाचं त्याला फळही मिळालं. मालक सुलाकुंटींचा विश्वास व प्रेम संपादन करून तो अल्पावधीतच त्याच कारखान्यातील चार मागांचा धनी झाला. अर्थात हे पद्मशाली नेते वडेपल्ली विठोबा पेद्मनिशी यांची किष्टम्यानं घालून दिलेली गाठ व वड्डेपल्ली विठोबा यांचं मार्गदर्शन आणि सदिच्छा यामुळं झालं. नरसय्याची अशी उत्तरोत्तर प्रगती होत गेली आणि तो सोलापुरातील एक प्रतिष्ठित आसामी बनला. एका साळियाच्या वडिलांनी म्हणजे नरसय्या नावाच्या आधीच्या एका साळियाने प्रतिकूल परिस्थितीशी, कोसळलेल्या अनेक संकटांशी, झगडत अविरत कष्टांनी स्वतःचं घर उभं केलं आणि बस्तान बसवलं. मुलगा इरय्या यालाही समाजप्रतिष्ठा मिळवून दिली. शून्यातून लखपती-अमीर-श्रीमंत कसं होता येतं याचीही चित्तवेधक व उद्‌बोधक कहाणी 'एका साळियाने' समरसून सांगितली आहे.

विणकर समाजातील दैन्यावर नेमकं बोट ठेवणारी आधीची लोककथा जशी 'एका साळियाने' या आत्मकथनाचं वेगळेपण आहे तशीच बोल्ली कुळाच्या नेत्रदीपक भरारीची रोमहर्षक कथाही आणखी एक वेगळेपण आहे जे पुढील पानं वाचायला उत्सुक करते. आत्मकथनाच्या क्षेत्रात एक आगळा वेगळा अभिनव अध्याय उघडण्याचं श्रेय या आत्मकथनाला एवढ्यासाठीच नव्हे तर अन्यही अनेक कारणांसाठी देता येतं. स्वतः लक्ष्मीनारायण बोल्ली यांचं चढ उताराचं आयुष्य उंच जागी एका कोळियानं घर बांधण्यासाठी केलेल्या धडपडीसारखं आहे. तेलंगणा संस्कृतीचं बहुतांशी अभिन्न अंग असलेल्या पद्मशाली साळी संस्कृतीचं घडवलेलं प्रामाणिक मनोज्ञ दर्शन हे या आत्मकथनाचं विशेषत्व आहेच पण एक तेलुगू भाषक मराठीवर मनापासून व जिवापासून भरभरून व सरसरून प्रेम कसा करतो याचा पानोपानी घडणारा प्रत्यय हे या आत्मकथनाचं बलस्थान आहे. श्रमिक साळियांच्या कष्टप्रद जीवनांचं वस्तुनिष्ठ चित्रण ही या आत्मकथनाची चमकदार किनार आहे.

लक्ष्मीनारायण बोल्ली यांचं मराठी प्रेम तेलुगूच्या वेलीवर मराठी टपोरी आणि सुगंधित फुलं फुलवण्याइतकं आणि कल्पना विलासानं व प्रगल्भ प्रतिभाशक्तीनं ती सदैव टवटवीत ठेवण्याइतकं. डॉ. सी. नारायण रेड्डी या ज्ञानपीठ पुरस्कार विजेत्या तेलुगू साहित्यिकाने 'आंध्र प्रभात' या तेलुगू मासिकात 'मराठी फुलली' या अर्थी लेख लिहून यास पुष्टी दिलेली आहे. तेलुगू आणि मराठी या दोन भाषाभगिर्नींना जोडणारा सप्तरंगी पूल म्हणजे लक्ष्मीनारायण बोल्ली असंच गौरवानं व सार्थतेनं म्हणता येतं, इतकी मराठीशी असलेली निखळ मैत्री व नितळ बांधिलकी 'एका साळियाने' पानापानावर सिद्ध केलेली आहे.

लक्ष्मीनारायण बोल्ली यांच्या नाट्यप्रेमाला आणि नाट्यवेडाला अनेक पुरस्कार लाभले. प्रायोगिक रंगभूमीवर या नाट्यकर्मीने अनेक व विविध पुरस्कार व पारितोषिके मिळवून विलक्षण पराक्रम केला. शोभा कल्याणी या कलाप्रेमी युवतीच्या साथसंगतीनं ही चमकधमक दाखवता आली. शोभा कल्याणी हाच उपहार या नाट्यसेवेला मिळाला असंही म्हणता येईल. जीवनातील अनेक व्यापांतून व व्यार्धांतून व्यावसायिक रंगभूमीवर हा चमत्कार करता आला असता तर मराठी रंगभूमीला अधिक झळाळी प्राप्त झाली असती इतकं लेखन सामर्थ्य व दिग्दर्शन कौशल्य लक्ष्मीनारायण बोल्ली यांच्यापाशी आहे हे दृढ विश्वासानं व 'एका साळियाने' या आत्मकथनाच्या आधारावर म्हणता येतं. लक्ष्मीनारायण बोल्ली यांचं नाट्यप्रेम असं आणि इतकं वादातीत आहे.

मराठी साहित्यक्षेत्रातलं, विशेषतः काव्यप्रांगणातलं लक्ष्मीनारायण बोल्ली याचं कर्तृत्व मोठमोठ्या मराठी साहित्यिकांनीही मान्य केलेलं आहे, म्हणून बा. भ.

बोरकरांसारखा दिग्गज कवी पुण्याचा एक महत्त्वाचा कार्यक्रम पुढे ढकलून लक्ष्मीनारायण बोल्ली यांच्या 'मैफल' या काव्यसंग्रहाच्या प्रकाशन समारंभाला आवर्जून उपस्थित राहतो आणि या काव्यसंग्रहाचं मोठ्या कोडकौतुकानं प्रकाशन करू शकतो. अधिक नाही उणं नाही इतकं प्रेम मातृभाषा तेलुगूवर असल्यानं तेलुगू ज्ञानपीठ पुरस्कार विजेते डॉ. सी. नारायण रेड्डी हेही उपस्थित राहून या प्रकाशन सोहळ्याची शोभा व पत वाढवतात. 'झुंबर' काव्यसंग्रहाला प्रकाशन प्रसंगी पु. ल. देशपांडे व पुन्हा डॉ. सी. नारायण रेड्डी या दोघांची लाभलेली शुभेच्छा ही तर मराठी आणि तेलुगू या दोन्हीही भाषांच्या उपासकाला लाभलेली लक्षणीय प्रशस्ती होती.

लक्ष्मीनारायण बोल्ली सारखा एक 'अमराठी' माणूस मराठीच्या अविश्रांत सेवेने मराठी साहित्य दरबारात केवळ हौसेनं नव्हे तर सक्षमतेनं, स्वपराक्रमानं व बहुमानानं बसू शकतो अशीच प्रचीती 'एका साळियाने' दिलेली आहे. बा. भ. बोरकर, पु. ल. देशपांडे यांच्या प्रमाणेच ज्ञानपीठ पुरस्कार विजेते वि. स. तथा भाऊसाहेब खांडेकर, आचार्य अत्रे, आरती प्रभू, ज्ञानपीठ पुरस्कार विजेते कवी कुसुमाग्रज अशा अनेक साहित्यश्रेष्ठींविषयी हा मराठी सारस्वत जी आदरभावना व्यक्त करतो तिला केवळ समर्पणाचा एक पदर आहे असं मानता येणार नाही; तर त्यांच्याजवळ सिद्ध झालेली या कवीची पात्रता या ऋणानुबंधांच्या संबंधात महत्त्वाची आहे असं निश्चितपणे म्हणता येतं. 'एका साळियाने' मध्ये हे सगळं वाचावयास मिळतं.

'एका साळियाने' मधले मराठी भाषेचे सौष्टव तेलुगू वेलीवर मराठी कशी फुलली याचा प्रत्यय घडवते ते असे: पेद्दादोराच्या फर्मानानुसार गुंडाराम गावची सारी रयत चावडीवर जमली होती. 'सारं गाव गुडघ्यात मान खुपसून, जमिनीत गाडल्यागत बसलं. आता त्यांच्या कानात कोणत्या आदेशाच्या शिशाचा रस ओतला जाणार, या भीतीनं साऱ्या गावाच्या काळजाचा ठोका चुकत होता.'... दसऱ्याच्या दिवशी नरसय्याची आणि वाघाची झुंज लावून देण्याचा पेद्दादोरानं निर्णय दिल्यानं 'सारं गावच अजस्र अजगराच्या विळख्यात सापडल्यासारखं अस्वस्थ होतं.'... यावर 'पहाटेचा उजेड फाकण्याआधी... अमानवी कृत्याच्या राज्यशकटापासून दूर दूर जायचं' असा नरसय्यानं विचार केला... मरण गिधाडाप्रमाणे आपल्या डोक्यावर घिरट्या घालतंच आहे' अशा भयभीत मनस्थितीत 'रातकिड्यांचा बारीक आवाज चहुदिशांनी ढेका धरल्यागत चालू' असताना बापाला पाठकुळी घालून 'मेल्यामढ्याला आगीची भीती कसली ?' असा स्वतःला धीर देत नरसय्या निघाला... 'सेन गरम् गुट्टाचा (डोंगराचा) उंच सुळका भुताप्रमाणे काळपट दिसत होता. तो हजार डोळ्यांना आपल्याला निरखत आहे असं उगीचच नरसय्याला वाटलं' मागील एका झुंजीचा प्रसंग नरसय्याला आठवला. प्रत्यक्ष वाघाशी ही झुंज नव्हती. नरसय्याचा आजोबा धाकय्या वाघ झाला होता. पेद्दादोरा भूपाळ रेड्डीनं ही झुंज कासीमपेठचा महाबली मल्ल भीमय्याशी लावली होती. धाकय्या जिंकला. शांत चित्तानं तो म्हणाला, 'जिंकणं हा खेळ आहे, ठार मारणं ही शिकार आहे.' पेद्दादोरा भूपाल रेड्डीला हे आवडलं नाही. तो 'तिरमिरला... वर्मी घाव घातलेल्या श्वापदासारखा तरातरा निघून गेला...' झेहराबाद मागं टाकून नरसय्या महाराष्ट्रातल्या सोलापूरच्या दिशेनं चालू लागला. 'दर वीस कोसावर पाणी आणि वाणी बदलते' याचा त्याला प्रत्यय आला.

तेलुगू मंडळी कामधंद्याला 'पनी पाटा' म्हणतात. 'जिणं आणि गाणं' हे त्यांचं जीवन सूत्र आहे. बोटात काम, ओठात गाणं हे तेलुगूपणाचं विशेष लक्षण आहे'... सोलापुरात किष्टय्याच्या घरासमोर येऊन नरसय्या थांबला. मागांचा 'टाक्-टुक्-टाक्-टुक' असा आवाज एका तालात ऐकू येत होता. 'श्रमदेवीचा तो जणू अप्रुप असा पदन्यासच होता'... तेलंगणा-तेलंगणातला 'मिरगम्' हा मृग उत्सव सोलापुरातही साजरा होतो. 'स्थळ आणि परिस्थिती बदलली तरी लोक संस्कृतीला अंतर देऊ नये, ही वृत्ती-साळीवाड्यातल्या विणकरांच्या जणू रक्तातच होती...' 'यल्लव्वा काकूच्या वागण्या बोलण्यात तेलंगणा संस्कृती हिंदकळताना दिसायची...' सामाजिक कार्यातून घडणार संस्कृतिदर्शन. साखर पेठेतल्या विहिरीत श्री

रामुलु व्यंकय्या यरगुंटा नावाचा विणकर बुडून मरण पावला होता. त्याचं सोलापुरात कुणीच आलं नव्हतं. क्रियाकर्म कुणी करायचं हा प्रश्न उभा राहिला. विठोबा बुर्गुल नावाचे वृद्ध गृहस्थ पुढे होऊन म्हणाले, 'मेलेला माणूस हा आपल्या पद्मशाली वंशाचा आहे... माणूस कुणीही असो, पण माणुसकीचा धर्म एकच आहे. स्वतःसाठी, स्वतःच्या घरासाठी कुणीही दिव्य करेल, पण ज्याचा काहीच संबंध नाही, त्याच्यासाठी केवळ माणुसकीच्या ओलाव्यानं काही करणं हाच खरा धर्म होय.' शाळेत असताना पाहिलेल्या या प्रसंगानंतर लेखकाला वेडीचांदी ही रेशमी झुल्फे सावरणारी, छातीवरचा फडफडणारा दुपट्टा आवरणारी, शेळ्या राखणारी घाटदार अंगाची, गोऱ्या रंगाची, धारदार नाकाची, रसरसत्या चैतन्याची मुलगी अशी आठवते, 'तिच्या गोऱ्यापान चंद्राच्या मुखावर देवीचे बारीक व्रण होते. गुलाबाला काटे असावेत असे...' वयाच्या पंधराव्या वर्षी पाहिलेली 'आजोळी नांदणारी, माझ्या तनमनात पुरती भिनून राहिली आहे...' तिथं मिरगमूच्या सणात घडलेलं एका मैफलीचं दर्शन; मोहाच्या फुलाच्या दारूच्या 'चार-पाच ग्लासांच्या फेरीनंतर ती मैफल भैरवीकडे झुकायची. काही तालेवार गडी तारेत बोलू लागत- डोलू लागत...' हे दृश्य पाहून लेखकाला त्याही वयात प्रश्न पडे, 'आम्ही पद्मशाली, स्वतःला पद्मब्राह्मण समजतो... ऋषी कुळाचे असताना आम्ही रूची कुळातले कसे झालो ?' मॅट्रिकच्या परीक्षेत अपयश आल्यावर, 'मी मात्र मोडीत निघालेल्या वस्तूसारखा घरात पडून होतो...'

तुळजापूरच्या देवळात पायऱ्यांवरून घसरून पडल्याचं निमित्त झालं. आयुष्यभर औषधाच्या वाऱ्यालाही न थांबलेली आजी भूदेवी हॉस्पिटलात उपचार चालू असतानाच वारली. 'कुटुंबात एक अमीट अशी पोकळी निर्माण झाली...' घरकाम करणारा 'महम्मद म्हणजे जणू तीन भाषांचा त्रिवेणी संगमच होता... त्याचा देह थकला तरी त्याचं मन आजही उत्साहाचं कारंजंच आहे...' भरलेलं घर-अशा 'घरात नेहमीच (येणाऱ्या) माणसांचा कोसळणारा पाऊस...' 'देहाला आंघोळ घालते ते पाणी आणि मनाला आंघोळ घालते ते तीर्थ' असे तीर्थरूप वडील इरय्या यांनी सहकारक्षेत्रात 'अमीर' अशी मुद्रा उमटवली...' असे नव्वदीतले वडील, 'जन्मात ज्यांनी ज्ञानेश्वरी पाहिली नाही, त्यांनी ज्ञानेश्वराला (फॅक्टरी हेच माझं देऊळ, आणि चैतन्यदायी कामगारवर्ग हीच माझी शक्ती असं म्हणून) असं पचवलं आहे...' 'आमच्या आप्तेष्टात आई म्हणजे ममत्वाचं कृपाळू झाड...' 'माझ्या वाटणीचा पैसा माझी पहिली पत्नी आणि दोन मुलं याच्या भरण पोषणासाठी त्यांच्याजवळ (आईवडिलांजवळ) जणू मी तारण म्हणून ठेवला होता...' 'प्रारब्धानं वाट्याला आलेलं कडू फळ बाजूला सारून स्वतःच्या पसंतीचं सुमधुर फळ निवडण्याचं भाग्य जगात क्वचित लोकांच्या वाट्याला येते. ते भाग्य माझ्या वाट्याला आलं...' वडिलांच्या समाजकार्य निवृत्तीनंतर धाकटा भाऊ सत्यनारायण उदयास आला. 'अवघ्या वयाच्या पस्तिसाव्या वर्षी त्याच्या अंगावर सहकार क्षेत्रातली राजवस्त्रे चढली...' गोपीचंदाची आंघोळ व पूजा यासाठी दीड तास खर्चणारा व या काळात कोणी बोलले तर वटारणारा सत्यनारायण म्हणजे 'मला वाटतं देवघरातले देवसुद्धा त्याच्या या वटारल्या जाणाऱ्या डोळ्यांचा धसका घेऊन असतील...'

दगडाची उशी करून गाढ झोपलेल्या लाकूडफोड्याला पाहून बँक अधिकारी लक्ष्मीनारायण बोल्लींना म्हणाले होते, 'अशी झोप कधी आली नाही.' त्यावरचं बोल्लींचं उत्तर, 'जेवण विकत घेता येतं, पण भूक विकत घेता येत नाही. पलंग विकत घेता येतो, पण झोप विकत घेता येत नाही...'

नाटकाविषयी प्रचंड ओढ आणि वेड या प्रमुख कारणांनी शोभा कल्याणींशी रास जुळली. 'काळे बेट लालबत्ती' नाटकातील कम्युनिस्ट कामगार नेत्याची भूमिका शोभाला खूप आवडली म्हणून तिनं तिच्या वेणीतलं गुलाबी रंगाचं टपोरलं फूल लक्ष्मीनारायण बोल्लींना दिलं. त्यांना वाटलं, 'तोच माझा पुरस्कार...' 'एकेकाळी न्यूनगंडानं पछाडला गेलेला मी चौफेर फुलू लागलो, बहरू लागलो. आयुष्यात लाभलेल्या तरुणाईचा रसिला आनंद मी शोभासारख्या बुद्धिवान

तरतरीत तरुणीच्या सहवासात घेऊ लागलो...' कुटुंबात वावटळ उठली. 'या माणसाला आता माझ्याशिवाय जिवलग कोणी नाही हे जाणून ती माझ्यात पूर्वीपेक्षा अधिक गुंतू लागली. मला गुंता सोडवायचा होता तर ती दुप्पट वेगाने गुंतत होती...' प्रणयातलं हे गुंतणं परिणयात रूपांतरित झालं.

एकत्र कुटुंबाची फाटाफूट अशी झाली, 'तेलंगणाहून आलेल्या रोपट्याचा झालेला वंशवृक्ष असा पंख झडलेल्या पक्ष्याप्रमाणे एकेक फांद्यांनी विलग होत, काहीसा ओकाबोका दिसू लागला...' मोठा मुलगा नरेश याच्या लग्नानंतरच्या स्वागत समारंभाला धाकटा भाऊ दशरथ मंडपात लक्ष्मीनारायण आणि शोभा उपस्थित असल्याने आला नाही. मुलाच्या मंडपातून या दोघांना जावं लागलं, तेव्हा तो आला. त्यावेळी लक्ष्मीनारायण बोल्लींना ब्रह्मांड आठवलं. 'माणूस कितीही वैरी असला तरी मरणदारी आणि तोरणदारी वैमनस्य विसरून येणं, ही आपली संस्कृती...'

तसं हे सगळंच वाचण्यासारखं. ही अशी काही अवतरणं एवढ्यासाठी की, तेलगू वेलीला मराठी फुलं कशी लहडली आहेत व ही फुलं कशी दरवळत आहेत हे लक्षात यावं म्हणून. शिवाय या अवतरणांतून लक्ष्मीनारायण बोल्ली यांचा साठ वर्षांचा जीवनपट आणखी काहीसा उलगडला जावा यासाठीही. तेलंग्याचा मराठी लेखनाशी संबंध नसतो. एका तेलंग्याच्या मराठी लेखनाची तयारी त्याच्या निबंधापासून झाली. तेलंग्याचं मराठी लेखन कितपत यशस्वी झालं ? लक्ष्मीनारायण बोल्ली यांना पडणाऱ्या या प्रश्नाचं उत्तर ही अवतरणे देतात. तेलुगू वेलीवर मराठी अशी फुलली हे खरंच. आणि एका साळियाने तेलुगू साडीवर मराठी कशिदा काढला हेही खरं, सुगंधित, लक्षवेधी असा सुरेख मनमोहक नक्षीदार काढला हे आणखी खरे !

असा हा तेलुगू वेलीवर मराठी फुलवणारा, मराठी फुलं बहरवणारा कवी 'एका साळियाने'च्या अखेरी अखेरी आत्मविश्वासानं जे म्हणतो ते लक्षात घेण्यासारखं आहे. बोल्ली म्हणतात, 'शंभर वर्षांपूर्वी दोरा रेड्डींच्या मस्तवाल अस्मानी सुलतानशाहीसमोर कुत्र्या मांजराप्रमाणे लटपट कापत जगणाऱ्या पद्मशाली नरसय्याचा नातू आज तेलंगणाच्या भू-प्रांतात व्याख्यानासाठी सन्मानाने आमंत्रित केला गेला, तर त्यावेळच्या अमानुष रेड्डी कुळातला एक तरुण विद्यार्थी-कार्तिक रेड्डी आज माझ्या व्याख्यानाने भारावून जाऊन मला भावनावेगाने मिठी मारतो ते चित्र... आणि हे चित्र...' आश्चर्याला आश्चर्य वाटावं असं ! विस्मयानं पुलकित होणारा हा कवी दुसऱ्या एका बदलत्या प्रखर वस्तुस्थितीनं व्यथित कसा होतो हेही बघण्यासारखं आहे.

सोलापूरच्या खड्डा हातमाग व्यवसायावर यंत्रमागामुळं सावट आलं. सोलापूरच्या साळी समाजाला 'या चिमण्यांनो, परत फिरा रे, घराकडे आपुल्या, जाहल्या तिन्ही सांजा जाहल्या' अशी साद घालून तेलंगणाची भूमी 'अशी तिन्ही सांजच्या वेळी' तिच्या लेकरांना बोलावीत होती. शंभर वर्षांपूर्वी तेलंगणातून येथे येणे आणि आता येथून पुन्हा तेलंगणाकडे प्रस्थान करणे असे एक आवर्तन पूर्ण होणार होते. एकंदरीत तेलुगू उद्यमी श्रमिक जीवांचं 'तेलंगणातून पुन्हा तेलंगणाकडे' असं आवर्तन घडो वा न घडो पण यातल्या विणकरांनी काळाच्या पटावर एक इतिहास कोरला आहे हेही खरं आहे. तेव्हा हा पद्मशाली साळी समाज तेलंगणाकडे परतू नको असं कोणत्याही मराठी सुहृदाला वाटणार. कारण यांच्यातल्याच एका साळियाने मराठीच्या पाटीवर आपलं नाव नक्षीदार कशिद्यासारखं कोरून ठेवलेलं आहे !

❖❖❖

**शांतिलाल भंडारी**
४०/४७ चारूश्री,
अभिमानश्री सोसायटी,
पुणे ४११ ००८.

●

एका साळियाने -
श्री. लक्ष्मीनारायण बोल्ली
पद्मगंधा प्रकाशन, पुणे.
पृष्ठे २८०, मूल्य : २५० रुपये.

# कार्यवृत्त नोंद

## (०१ सप्टेंबर २००७ ते ३० नोव्हेंबर २००७)

### प्रमुख कार्यवाह

**दि. ७ सप्टेंबर २००७ : रंगभूमी दिनानिमित्त :**

म.सा.प.च्या नाट्यविभागातर्फे दि. ५ सप्टेंबर २००७ रोजी असलेल्या रंगभूमी दिनानिमित्त 'रंगभूमी' मासिकाच्या शताब्दीनिमित्त 'आजची समांतर रंगभूमी' या विषयावर परि-संवाद आयोजिला होता. डॉ. सौ. मेधा सिधये यांनी या परिसंवादाचे सूत्रसंचालन केले. परिसंवादाचे अध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे होते. स्थानिक कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी पुष्पगुच्छ देऊन सहभागी वक्त्यांचे स्वागत केले. नाट्यक्षेत्रातील मोहित टाकळकर, शुभांगी दामले, धर्मकीर्ती सुमंत, अतुल पेठे अशा नामवंतांनी परिसंवादात आपले विचार प्रकट केले. शेवटी प्रश्नोत्तर रूपात उपस्थित श्रोते आणि व्यासपीठावरील वक्ते यांच्यात सुसंवाद/चर्चा झाली.

**दि. १० सप्टेंबर २००७ : स्वामी स्वरूपानंद स्मृतिव्याख्यान :**

संकल्प मंगल कार्यालयाच्या सभागृहात डॉ. अजित कुलकर्णी यांचे 'ज्ञानेश्वरांचा चिद्‌विलासवाद आणि स्वामी स्वरूपानंद' या विषयावर व्याख्यान झाले. याप्रसंगी व्यासपीठावर डॉ. वि. भा. देशपांडे, प्रभाकरपंत नांदूरकर, वसंतराव देसाई, नानासाहेब मालशे ह्यांची सन्माननीय उपस्थिती होती. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन स्थानिक कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी केले व प्रास्ताविक प्रमुख कार्यवाह डॉ. वि. भा. देशपांडे यांनी केले. व्याख्याता सुनंदा शाळिग्राम यांच्या हस्ते प्रारंभी वक्ते डॉ. अजित कुलकर्णी यांचा शाल व श्रीफल देऊन सत्कार करण्यात आला.

**दि. २७ सप्टेंबर २००७ :**

बालकवी स्मृतिदिनानिमित्त निसर्ग कविता या विषयावर निमंत्रित कवींचे काव्यसंमेलन आयोजित केले होते. अध्यक्षस्थानी डॉ. वि. भा. देशपांडे होते. सूत्रसंचालन प्रा. मिलिंद जोशी व कविसंमेलनाचे सूत्रसंचालन उद्धव कानडे यांनी केले. परिषदेच्या




साहित्य अकादमीचा यंदाचा अनुवाद- पुरस्कार प्राप्त कवयित्री आसावरी काकडे यांचा महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे सत्कार करताना परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे. या निमित्त आयोजित केलेल्या काव्यवाचनाचे सूत्रसंचालन अंजली कुलकर्णी यांनी केले.



अनुक्रमणिका

पदाधिकारी डॉ. माधवी वैद्य यांनी उत्स्फूर्तपणे आरती प्रभूंची काव्यरचना ऐनवेळी सादर केली. तसेच वैशाली मोहिते, आश्लेषा महाजन, प्रफुल्ल गोखले, डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी, स्वाती सामक, मीरा शिंदे, चंद्रकांत वानखेडे, प्रभा सोनवणे, रवी पाईक व दीपक करंदीकर या निमंत्रित कवींनी आपल्या काव्यरचना सादर केल्या.

**दि. २१ सप्टेंबर २००७ :**

एस. जी. कोळेकर एंटरप्राईझेस व म. सा. परिषदेच्या सहकार्याने २१ सप्टेंबर पासून म.सा.प.च्या तळघरातील जागेत 'साहित्य आनंद मेळावा' या शीर्षकांतर्गत पुस्तकांचे भव्य प्रदर्शन/विक्री चालू करण्यात आले. सकाळी ११ वाजता प्रसिद्ध कवयित्री डॉ. अरूणा ढेरे यांच्या हस्ते प्रदर्शनाचे उद्घाटन झाले. मा. शंकर सारडा प्रमुख पाहुणे व डॉ. वि. मा. बाचल ह्यांची विशेष अतिथी म्हणून उपस्थिती होती. तसेच डॉ. सतीश देसाई, प्रा. मिलिंद जोशी, ह. ल. निपुणगे, सुनील अंबिके यांचीही उपस्थिती होती.

**दि. ३ नोव्हेंबर २००७ :**

कोजागिरी पौर्णिमेनिमित्त निमंत्रितांचे कविसंमेलन आयोजित केले होते. अध्यक्षस्थानी सौ. आसावरी काकडे होत्या. यानिमित्ताने साहित्य कला अकादमीचे अनुवादाचे पारितोषिक त्यांच्या 'बोल माधवीचे' या अनुवादित काव्यसंग्रहास मिळाल्यानिमित्त परिषदेतर्फे त्यांचा सत्कार करण्यात आला. त्यांनी आपले मनोगत प्रकट केले. सूत्रसंचालन नंदा सुर्वे व कविसंमेलनाचे सूत्र संचालन अंजली कुलकर्णी यांनी केले. प्रास्तविक डॉ. वि. भा. देशपांडे यांनी केले. हेमंत जोगळेकर, ज्योत्स्ना चांदगुडे, दीपक करंदीकर, उद्धव कानडे, ऋतुजा फुलकर, सुधीर फाटक, राहुल देशपांडे, गौरी गोडबोले या निमंत्रितांनी प्रत्येकी दोन काव्यरचना सादर केल्या. प्रा. मिलिंद जोशी यांनी आभार मानले.

**दि. ४ नोव्हेंबर २००७ :**

नवनिर्वाचित ८१व्या अ.भा.म. साहित्य संमेलनाचे अध्यक्ष प्रा. म. द. हातकणंगलेकर यांचा व स्वागताध्यक्ष उत्तम कांबळे यांचा भव्य सत्कार परिषदेतर्फे अध्यक्ष प्रा. द. मा. मिरासदार यांचे शुभहस्ते करण्यात आला. परंपरेप्रमाणे, दरवर्षी नवनिर्वाचित अध्यक्षांचा पहिला जाहीर सत्कार म.सा.प. पुणे तर्फे केला जातो. ती परंपरा




सांगली येथे होणाऱ्या ८१व्या अखिल भारतीय मराठी साहित्यसंमेलनाचे निर्वाचित अध्यक्ष प्रा. म. द. हातकणंगलेकर यांचा प्रथम सत्कार म. सा. परिषदेचे अध्यक्ष प्रा. द. मा. मिरासदार यांच्या हस्ते झाला. त्याप्रसंगी आपले विचार व्यक्त करताना म. सा. परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे, डावीकडून उत्तम कांबळे, प्रा. द. मा. मिरासदार, प्रा. म. द. हातकणंगलेकर आणि प्रा. मिलिंद जोशी.



अनुक्रमणिका

यावर्षीही सांभाळली गेली. स्थानिक कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी सूत्रसंचालन केले. कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांनी स्वागत व प्रास्ताविक केले. नियोजित संमेलनाचे स्वागताध्यक्ष ज्येष्ठ पत्रकार उत्तम कांबळे यांचाही सत्कार यानिमित्ताने केला गेला. अरुण जाखडे यांनी प्रा. हातकणगलेकरांचा व अनंत दीक्षित यांनी उत्तम कांबळे यांचा परिचय करून दिला. प्रा. बाळ गाडगीळ यांनीही विचार प्रकट केले. प्रा. हातकणंगलेकर व उत्तम कांबळे यांनी सत्काराला उत्तर दिले व प्रा. मिरासदारांनी अध्यक्षीय समारोप केला. समारंभास खास सांगलीहून अध्यक्षांचे चाहते व कार्यकर्ते आले होते. साहित्य क्षेत्रातील अनेक मान्यवर सत्कारास आवर्जून उपस्थित होते.

**दि. १५ नोव्हेंबर २००७ :**

दिवाळी अंकांचे प्रदर्शन परिषदेच्या तळघरातील जागेत पुस्तक प्रदर्शनाबरोबरच १५ तारखेपासून सुरू करण्यात आले. त्याचे उद्घाटन ज्येष्ठ लेखक ह. मो. मराठे व उपाध्यक्ष चंद्रकांत शेवाळे यांच्या हस्ते झाले. कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे व्यासपीठावर उपस्थित होते. तसेच डॉ. द. ता. भोसले, रत्नाकर कुलकर्णी, ह. ल. निपुणगे, म. श्री. दीक्षित, श्रीधर सहस्रबुद्धे ह्यांची उपस्थिती होती. डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी यांनी सूत्रसंचालन केले. प्रास्ताविक प्रा. मिलिंद जोशी यांनी केले. श्री. मराठे व श्री. शेवाळे यांनी आपले विचार प्रकट केले.

**दि. १९ नोव्हेंबर २००७ :**

'दिवाळी अंकांचे मराठी साहित्यातील योगदान महत्त्वपूर्ण आहे का ?' या विषयावरील परिसंवादाचे अध्यक्षस्थान डॉ. अरविंद संगमनेरकर यांनी भूषविले. त्यांनी शेवटी परिसंवादाचा अध्यक्षीय समारोप केला. परिसंवादाचे सूत्रसंचालन डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी यांनी केले. प्रास्ताविक ह. ल. निपुणगे यांनी केले. डॉ. कुमार सप्तर्षि, चंद्रकांत शेवाळे, सौ. मंगला गोडबोले, प्रा. मिलिंद जोशी यांनी परिसंवादात भाग घेतला व आपले विचार प्रकट केले. मधू नेने, नंदा सुर्वे, म. श्री. दीक्षित, डॉ. आनंद यादव, रागिणी पुंडलिक यांची विशेष उपस्थिती होती. दीपक करंदीकर यांनी आभार मानले.

**दि. २२ नोव्हेंबर २००७ :**

थोर लेखिका, गायिका कै. योगिनी जोगळेकर स्मृतिदिन : त्यांच्या कुटुंबियांनी नुकत्याच दिलेल्या देणगीद्वारे यावर्षीपासून योगिनीताईंचा स्मृतिदिन दरवर्षी साजरा करण्यात येणार आहे. यावर्षी निमंत्रित कवयित्रींचे काव्यसंमेलन लेखिका सौ. सुनेत्रा ओक यांच्या अध्यक्षतेखाली आयोजित करण्यात आले. व्यासपीठावर योगिनीताईंचे पुष्पहार घातलेले छायाचित्र दर्शनी भागात ठेवण्यात आले होते. सौ. सुनेत्रा ओक यांनी आपले विचार व कविता याप्रसंगी सादर केल्या. व्यासपीठावर परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे होते. कविसंमेलनाचे सूत्रसंचालन डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी यांनी केले. तर डॉ. नीलिमा गुंडी, ज्योती मुंगी, शशिकला जोशी, माधवी आपटे, डॉ. विद्यागौरी टिळक, राजलक्ष्मी देशपांडे, डॉ. मधुरा कोरान्ने, अंजली कुलकर्णी, शीला निपुणगे, प्रतिभा पवार, सुनीती लिमये, डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी यांनी प्रत्येकी दोन काव्यरचना सादर केल्या. सुधन्वा जोगळेकर, ह. ल. निपुणगे, मधू नेने, प्रा. मिलिंद जोशी यांची विशेष उपस्थिती होती. डॉ. वि. भा. देशपांडे यांनी विचार प्रकट केल्यावर दीपक करंदीकर यांनी आभार मानले. प्रमुख कार्यवाह डॉ. माधवी वैद्य यांनी योगिनीताईंच्या दोन रचना सादर केल्या.

---

# शाखा कार्यवृत्त

## इस्लामपूर शाखा

**दि. २३ मे २००७ :**

ग्रामीण कथाकार डॉ. व्ही. बी. कुलकर्णी यांच्या स्मृतिदिनानिमित्त ग्रामीण कथाकार प्रा. सुभाष खोत यांचे कथाकथन आयोजिले होते. प्रा.एस.के. कुलकर्णी अध्यक्षस्थानी होते. कार्याध्यक्ष वृषाली आफळे व अध्यक्ष प्रा. दशरथ पाटील उपस्थित होते.

कार्यवाह

## उल्हासनगर शाखा कार्यवृत्त

**दि. ३० सप्टेंबर २००७ :**

लोककवी प्रा. प्रशांत मोरे यांनी 'कविता जनातली कविता मनातली' हा कार्यक्रम सादर केला.

दिलीप मालवणकर
कार्याध्यक्ष

दिनकर खोसे
प्रमुख कार्यवाह

## जळगाव शाखा कार्यवृत्त

**दि. १२ ऑगस्ट २००७ :**

परिषदेची जळगाव शाखा व साहित्यारंभ मासिकातर्फे प्रा. डॉ. अजित वाघ यांचे अध्यक्षतेखाली कवी रा. ना. कापुरे लिखित 'आठवणीतील आई' ह्या कवितासंग्रहाचे व 'फुलवेडा' या कादंबरीचे प्रकाशन प्रा. डॉ. किसन पाटील व आकाशवाणी केंद्रनिर्देशक मा. हेमंत सपकाळे यांच्या हस्ते झाले. राष्ट्रपती मा. प्रतिभाताई पाटील यांच्या चित्रांकनाचे प्रकाशन कवी नारायण शिरसाळे यांनी केले. प्रास्ताविक अशोक कौतिक कोळी यांनी केले. प्रा. दिनेश पाटील यांनी आभार मानले.

**दि. १३ ऑगस्ट २००७ :**

बालकवींचा अपघाती मृत्यू ज्या भादली रेल्वे स्टेशनवर झाला. तेथे त्यांच्या जयंतीनिमित्त कविसंमेलन आयोजित करण्यात आले. कवी भगवान भाटकर अध्यक्षस्थानी होते. सुरेश यशवंत चौधरी, विमल वाणी, शुभांगी कुलकर्णी, के. यू. शेख, रा. शं. साळुंके, मिलिंद बागूल, तुषार वाघुळदे, सुरेश चव्हाण, ना. स. बडगुजर, प्रकाशचंद्र तेलंग, प्रा. प्र. भ. चौधरी, प्रा. दिनेश पाटील, लीला सपकाळे, शिवलाल बारी, प्रकाश पाटील, नारायण शिरसाळे, शिवराम शिरसाठ या कवींनी सहभाग घेतला.

सूत्रसंचालन कार्यवाह तुषार वाघुळदे व आभार प्रदर्शन प्रा. पी. बी. चौधरी यांनी केले.

**दि. ९ सप्टेंबर २००७ :**

खानदेश एकता साहित्य मंडळाच्या वतीने प्रा. नारायण शिरसाळे यांच्या अध्यक्षतेखाली लेखक रा. हो. साळुंके यांच्या 'चकवा' या कादंबरीवर प्रा. दिनेश पाटील यांनी चर्चात्मक विचार मांडले. तसेच डॉ. प्रा. बापूराव देसाई यांनी किरण सोनी लिखित 'मेरी कृतीमें उन्ही की प्रतिकृती' या काव्यसंग्रहावर आपले विचार प्रकट केले. संचालन खालिद सय्यद यांनी केले. आभार प्रकाशचंद्र तेलंग यांनी मानले.

**ऑक्टोबर २००७ :**

पुस्तक चर्चा व कोजागिरीनिमित्त कविसंमेलन

**नोव्हेंबर २००७ :**

कथा व काव्य लेखन - दोन व्याख्याने व पुस्तक चर्चा.

कार्याध्यक्ष प्रा. दिनेश पाटील. **कार्यवाह**

---

## धुळे जिल्हा शाखा कार्यवृत्त

धुळे जिल्हा शाखेची पंचवार्षिक कार्यकारिणीची निवड करण्यात आली. ती खालीलप्रमाणे :

अध्यक्ष : (४ जुलै २००७ पासून) प्राचार्य सुलभा भानगावकर उपाध्यक्ष : सी. बं. रावळे, प्रा. डॉ. कैलास सार्वेकर, कार्याध्यक्ष प्रा. डॉ. सौ. शशिकला पवार, कार्यवाह मोहन मोरे, प्रा. आशुतोष पाटील, तसेच कार्यकारिणी सदस्य : विश्वनाथ मोराणकर, प्रा. डॉ. सुरेंद्र मोरे, प्रा. डॉ. सर्जेराव भामरे, पापालाल पवार, सौ. सुमन महाले, प्रा. प्रतिम चौक, प्रा. सविता बहाळकर, प्रा. प्रभा निकुंभे, प्रा. बी. बी. महाजन.

**३१ ऑक्टोबर २००७ :**

कै. प्रा. डॉ. अनंतराव पाटील स्मृतिदिनानिमित्त कथावाचनाचा कार्यक्रम आयोजित करण्यात आला होता. कै. पाटील यांच्याच कथांचे वाचन झाले. सौ. मीराताई धाराशिवकर या गरूड वाचनालयाच्या संचालिका अध्यक्षस्थानी होत्या. **कार्यवाह**

---

## देणगीदार

| क्र. | नाव | रक्कम | |
|---|---|---|---|
| १) | श्री. कौत्सुभ मधुसुदन नेने | ३०००/- | योगक्षेमार्थ देणगी |
| २) | श्रीमती इंदुमती गो. नलावडे | ५०००/- | ग्रंथालयासाठी देणगी |
| ३) | डॉ. वि. भा. देशपांडे | ५०००/- | योगक्षेमार्थ देणगी |
| ४) | डॉ. मु. श्री. कानडे | १०,०००/- | योगक्षेमार्थ देणगी |
| ५) | श्री. व्ही. आर. भागवत | १०,०००/- | योगक्षेमार्थ देणगी |
| ६) | श्री. श्रीधर विश्वनाथ सहस्त्रबुद्धे | २०००/- | स्मृतीदिनासाठी |

डॉ. माधवी वैद्य, प्रमुख कार्यवाह



Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : October to December 2007
Registered with the register of Newspaper for India under No. 6398/57





प्रेषक
प्रमुख कार्यवाह,
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे-४११०३०.
दूरभाष : ०२०-२४४७५९६३.

बुक-पोस्ट

प्रति

अनुक्रमणिका





